# प्रस्तावना.

जगन्नियंत्या परमेश्वरानें मानवी प्राण्यांचे निर्वाहाकरितां अनेक पदार्थ व जनावरें उत्पन्न केलीं आहेत. त्यांत गुरांइतकें मनुष्यमात्राचे उपयोगी पडणारें दुसरें कोणतेंही जनावर नाहीं. मनुष्याचे निर्वाहाचें मुख्य साधन जें धान्य त्याची प्राप्ति ह्यांच्या साह्यावांचून निदान या देशांत तरी इतर कोणत्याहि जनावरांच्या साह्यानें होणें नाहीं. गाई व म्हशी यांपासून मनुष्यांस सुलभ रीतीनें प्राप्त होणारें जें दूध आणि त्याचेंच मिश्रणानें केलेले निरनिराळे प्रकार यांच्या अत्युपयुक्ततेविषयीं जगविख्यात अनुभव आहेच. म्हणून पाल्हाळ केला पाहिजे असें नाहीं. ह्या साठीं ज्या प्रमाणें मनुष्यानें स्वतांच्या व कुटुंबांतर्गत इतर मनुष्यांच्या आरोग्यतेविषयीं जशी काळजी वाहणें भाग आहे तशीच आपल्या गुरांच्या आरोग्यतेविषयीं ही खबरदारी ठेवणें भाग आहे. आणि हेंच मनांत आणून आजपर्यंत जे जे वैद्यशास्त्रवेत्ते झाले त्यांनीं जसे मानवारोग्यतेविषयीं ग्रंथ लिहिले तसेच गुरांविषयीं ही लिहिणें अवश्य होतें. परंतु तसा प्रकार घडल्याचीं उदाहरणें दुर्मिळ आहेत. ही उणीव कमी व्हावी यास्तव हा विषय जाणणार लोकांचे साह्यानें आज बहुत दिवस आम्हीं गुरांस होणाऱ्या रोगांचीं व विकारांचीं लक्षणें आणि रोगशामक औषधें अनुभवून पाहण्याचें काम हातीं धरून त्यांत ज्या ज्या रोगांविषयीं आम्हास माहिती मिळाली आहे तिचा व रोगशामक त्या त्या औषधीं विषयीं आमची खात्री

# प्रस्तावना.

आम्ही त्यांचा उपयोग सर्व देशबांधवांसही व्हावा म्हणून हें पुस्तक तयार करून त्याची पहिली आवृत्ति सन १८८३ त छापून प्रसिद्ध केली.

यांत गुरांस होणाऱ्या रोगांचीं लक्षणें व कारणें आणि त्यावर हटकून गुण देणारीं औषधें स्पष्ट करून दाखविलीं आहेत. तसेंच आरंभीं गुरांस कसें पाळावें, त्यांचें पोषण कसें करावें इत्यादिकांचें विवेचनही केलें आहे.

या पुस्तकाचा सर्वत्र सारखा उपयोग व्हावा यास्तव प्रौढ भाषा न घेतां प्रचारांत चालणारी सरळ आणि साधी अशीच भाषा घेतली आहे.

प्रथमावृत्तीपेक्षां या दुसऱ्या आवृत्तींत कांहीं विशेष रोग जे अनुभवास आले त्यांचीं लक्षणें आणि अनुभविक औषधें ही विशेष दाखविलीं आहेत.

या पुस्तकाच्या पहिल्या आवृत्तीस जसा लोकांकडून व कांहीं ठिकाणचे लोकल बोर्डांकडून आश्रय मिळाला तसाच आतांही मिळेल आणि दिवसेंदिवस अशा प्रकारचे अनुभविक ग्रंथ लिहिण्यास देशबांधव उत्तेजन देतील अशी आशा आहे.

वासुदेव चिंतामण आपटे व०
मौजे नारिंग्रें, ता० देवगड, जि० रत्नागिरी.

# गुरांचा वैद्य.

## गुरें बाळगणारांनीं अवश्य ज्या गोष्टी लक्षांत ठेविल्या पाहिजेत त्यांविषयीं व्याख्या.

गुरें बाळगणारे लोकांनीं नित्य प्रातःकाळीं व सायंकाळीं प्रत्येक जनावराची स्थिति नित्य क्रमाप्रमाणें आहे किंवा, त्यांत कांहीं न्यूनाधिक्य आहे हें लक्ष्यपूर्वक पाहिलें पाहिजे.

गुरांचे आरोग्यतेचीं चिन्हें हीं आहेत कीं, सडसडीत व हुशार असणें, रवंथ करणें, वैरण खाणें, पाणी पिणें, मुस्कुटीवर म्हणजे नाकपुड्यांजवळील भाग (वरील ओंठ) ओलसर असणें, क्षणाक्षणीं रवंथाचा ग्रास गिळून किंचित विसावा घेऊन पोटांतून दुसरा ग्रास वर काढणें (तोंडांत आणणें), कोणताही पदार्थ पुढें टाकिला असतां अवघ्राण करून (हुंगून पाहून) भक्षणीय असल्यास उचलून खाणें व एकाएकीं आंगास स्पर्श केला असतां किंवा बारीक खडा मारिला असतां शहारा करणें (त्वचा हालविणें), संवईचा मनुष्य जवळ असल्यास त्याचें आंग हुंगणें, अथवा चाटणें, परकी मनुष्य जवळ गेला असतां बुजणें (चंचळपणा दाखविणें); हीं साधारण आरोग्यतेचीं लक्षणें आहेत.

म्हशी व रेडे (टोणगे) हीं जनावरें आर्ष असतात यामुळें

चंचलत्वादिक गुण त्यांचे अंगीं जरी कमी असतात तथापि रवंथ व भांबर करणें, अटून त्यागें इत्यादि चिन्हें हीं त्यांच्याही आरोग्यतेचीं लक्षणें आहेत.

वर सांगितलेलीं लक्षणें वेळोवेळीं जशीं मालकानें पाहावयाचीं, तशींच रानांत गुरें चारण्यास नेणारे राखणदारांनीं हि वारंवार गुरांवर नजर देऊन पाहिलीं पाहिजेत.

## कालपरत्वें गुरें बांधण्याची जागा.

हवेंत जरी वेळोवेळीं फेरफार होत असतो, तरी मुख्यत्वें करून प्रतिवर्षी उन्हाळा, पर्जन्यकाळ, आणि थंडी ह्या तीन प्रकारचे भेद होतात.

पर्जन्यकाळीं आणि थंडीचे दिवसांत गुरें बांधण्याची जागा (गोठा) चारी बाजूंनीं भिंती किंवा मजबूद लिंपणांच्या कूड व वर छप्पर असून जागोजाग मोकळी हवा गुरांचे अंगावरून जाण्याकरितां त्या भिंतीस झरोके किंवा खिडक्या ठेविलेल्या असाव्या अशा जागीं गुरें बांधीत जावें.

गुरें बांधण्याकरितां जी जागा (जमीन) तयार करावयाची ती पुढील भागास किंचित उंचवट असून मागील बाजूनें कांहींशी उतरती असावी. व प्रत्येक गुराचे मागें एक एक मोरी (भिंतीस भोंक) असावी. या योगानें गुरांचें मूत्र तत्काल बाहेर निघून जातें. आणि चिखल (रेंद) न होतां गुरांस सुखानें विश्रांति घेतां येते.

पर्जन्यकाळीं पर्जन्य कमी आहे असें संधी पाहून व थंडीचे दिवसांत महिन्यांतून दोन वेळां रात्रीं गुरें मोकळें जा-

त्यांत बांधावीं. आणि रात्रीचा दंव (दहिंवर) त्यांचे अंगावर पडूं द्यावा. हा त्यांस सुखकर व आरोग्यकारक आहे.

गुरांचें शेण वेळोंवेळीं काढून टाकीत जावें व गोठ्यांतील जमीन चांगली स्वच्छ व कोरडी ठेवावी. या योगानें गुरांचे पायांचीं गेंळें कुजत नाहींत. आणि त्यांचे मनास आनंद व आराम होतो.

उन्हाळे दिवसांत चारी बाजूंनीं मोकळी हवा येण्या सारखी जागा पाहून स्वच्छ मंडप करून त्यांत गुरें बांधावीं. या योगानें दिवसा तीक्ष्ण उन्हांत फिरल्यामुळें गुरांचे शरीरांतील जें रक्त तप्त (गरम) झालेलें असतें तें स्वच्छ व शीतल हवेनें शांत होऊन गुरें निरोगी रहातात.

गुरें बांधण्याच्या कोणत्याही जाग्या सभोंवतीं दुर्गंधी किंवा उच्छिष्ट गवताचा संचय व फार दिवशी शेणाचा गोंवर ही ठेवूं नयेत. कारण कीं त्यापासून पुगा (पिस्वा) उत्पन्न होतात व घाणीच्या हवेपासून रोगोद्भवही होतो. याजकरितां जागा स्वच्छ ठेवावी.

गोठ्याची जमीन प्रतिवर्षी एकवेळ नवी करावी. व सभोंवारच्या भिंती दोन्ही बाजूंनीं वर्षांतून दोन वेळ चांगल्या लिंपून सारवाव्या. येणें करून भिंतीस छिद्रें पडून त्यांत विषारी प्राण्यांस रहाण्याची संधी मिळत नाहीं; तसेंच भिंतींच्या लहान लहान फटींतून (छिद्रांतून) गोचडया शिरून रहातात आणि त्यांचा मोठा विस्तार वाढतो आणि त्या गुरांस फारच त्रास देतात, तसें होण्याची भीतिही कमी होते.

गुरें गोठ्यांतून दुसरे जागीं बांधण्यास नेलीं असतां तीन दिवस गवत त्या गोठ्यांत दिवा लावून ठेवावा म्हणजे पिसवा होत नाहींत.

## गुरांस खाणें घालण्याविषयीं.

गुरांनीं गवत किंवा ओली चारा स्वेच्छेनें रानांत पाहिजे तितकी खाल्ली तरी चिंता नाहीं. व तीं आपोआप जितकी तृषा असेल तितकें पाणी पितात; परंतु जीं गुरें बांधून ठेविलेलीं असतात, त्यांस खातील तितकें तृण आणि पर्जन्यकाळीं व थंडीचे दिवसांत प्रतिदिवशीं दोन वेळ प्रमाणें पाणी द्यावें. आणि उन्हाळे दिवसांत प्रातःकाळीं व दोनप्रहरीं आणि सायंकाळीं याप्रमाणें तीन वेळ पाणी देत जावें.

रानांत गुरें चारण्यास सोडणें तीं सूर्योदयापूर्वीं सोडावीं म्हणतात चाऱ्यावर दंव (दहिंवर) पडलेला असतो, तो गुरांचे खाण्यांत येतो. हा दंव हितकारक आहे.

ज्या ठिकाणीं पर्जन्यकाळीं चारी बाजूंचें पाणी सखल जमिनींत एकत्र जमतें व त्यांत जें तृण उत्पन्न होतें तें गुरांस खाऊं देऊं नये. कारण तें तृण संचित पाण्यांत उत्पन्न होत असल्यानें पाण्यांतील रोगरूपी तवंग तृणांत भिनून तें रोगी झालेलें असतें. यामुळें अशा तृणाचे सेवनानें रोगोद्भव होतो.

नांगरांस किंवा गाड्यांस बांधण्याचे बैल किंवा टोणगे

यांजला सदोदित खुराक, पेंड किंवा दाणा देत ऱ्हावें. परंतु तो नियमित असावा; व शक्तीप्रमाणें प्रसंगीं जास्तही द्या- वा. परंतु कमी करूं नये. कांहीं लोकांची अशी चाल अ- सते कीं, ज्या दिवशीं बैल किंवा रेडणें कामगिरीस असतात. त्या दिवशीं मात्र खुराक देतात; एऱ्हवीं देत नाहींत. परंतु अशा योगानें जनावराची भूक भरती न होऊन श- क्ति क्षीण होते. व याच कारणानें त्यांच्यानें मग नेहमीचें काम करवत नाहीं.

कित्येक ठिकाणीं अशी विलक्षण चाल पडलेली आढळ आली आहे कीं, गाई किंवा म्हशी जोंपर्यंत दूध देत असता- त. तोंपर्यंत त्यांस दुधक, चारा वगैरे सर्व तऱ्हेची बंदोबस्त ठेवितात. परंतु तें गुरूं दूध देईनासें झालें म्हणजे एकदम त्यांचा खुराक बंद करितात. जरी तें गुरूं गाभण असलें त- री तें विईपर्यंत त्याजकडे त्यांचें दुर्लक्षच असतें. यामुळें त्या गाई किंवा म्हशी शक्तिहीन होऊन प्रसूतिसमयीं त्यांचे फार हाल होतात; इतकेंच नव्हे, तर कित्येक प्राणासही मु- कतात. दैववशात सुटका झालीच तर निःशक्ततेमुळें आंग येण्याची संवय लागते आणि कित्येक उठवणीस येतात. आणि त्यांनच त्यांचा अंत होतो. याजकरितां, जे गुरें बाळ- गणारे आहेत त्यांनीं, ज्या प्रमाणें आपले प्राणाचे पोषणा विषयीं नजर ठेवावयाची, तशीच गुरांविषयीं ही ठेविली पा- हिजे. म्हणजे जरी गुरूं दूध देत नसलें, आणि भाकड किंवा गाभण असलें तरी त्याजला दुधक किंवा एकवेळ जेसा मू-

ळचा संप्रदाय असेल त्या नियमानें सदोदित खाणें, पि-णें, पावें. या योगानें तीं सशक्त राहून पुढें त्यांपासून हो-णारीं संतानेंही शक्तिमान होतें. व मुळींच जर शक्तिहीन झालेलीं गुरें असलीं, तर त्यांचे आंगांत नव्या रक्ताची वृद्धि झाल्यावांचून तीं दूधही देणार नाहींत. हें एक नु-कसानच आहे. यास्तव समदृष्टीनें भाकड गाई किंवा म्हशी यांचीही चांगली जतन करावी.

बैलांस खुराक - तीळ, भुईमुग, करडी, खोबरें, आं-बाडी यांची पेंड, उडीद, हरभरे, मट, बाजरी, भिजलेले वरणें, तुरीच्या डाळीची चुरी (कोरमें), सरक्या, धान्याचें फुटव इत्यादि पदार्थ योग्य आहेत. जोंधळ्याचा कडबा चांगला; परंतु फक्त जोंधळेच गुरानें फार दिवस खाल्ले अ-सतां तें गुरें पर्जन्यकाळीं जड (सुस्त) होतें.

गुरांस जें पाणी पाजणें तें नद्या व ओढे जोंपर्यंत सवाही असतील तोंपर्यंत त्यांतील किंवा मोठा तलाव अ-सल्यास त्यांतील पाणी पाजावें. परंतु नद्या किंवा ओढे यांचा प्रवाह बंद झाल्यावर जागजागीं सखलवटांत तें पा-णी सांचून (जमून) राहिलेलें असतें व त्याजवर तवंग येऊन बाजूची जमीन तांबूस किंवा पिंवळट रंगाची दिसूं लागते. व त्यापाण्यावर दुर्गंधीयुक्त शेवाळी धरते, तें पाणी भगदीं देऊं नये; कारण असें पाणी पिण्यांत आल्यानें संचित विषारी (अपकारक) पदार्थानें मिश्र झालेली माती पोटांत जाऊन त्यापासून रोगोद्भव होतो. उदाहरण असें

कीं, ज्या वर्षी कोणत्याही प्रदेशांत अरवेरीचे दिवसांत पाण्याचा आवाट पडतो त्यावर्षी त्या प्रदेशांत गुरांच्या रोगाची साथ येते.

थंडीचे दिवसांत बैलांस वगैरे मुगांचें याफणें द्यावें. तें असें कीं मूग चांगले शिजवून पगतेंत काढावे आणि थोडें मीठ, गूळ, तूप, सुंठ, कोष्टकोळिंजण, वेखंड, मिर्ये, व हळद या समान औषधांची पूड करून सुमारें सहा मासे पर्यंत त्यांत घालावी आणि चांगलें मर्दन करून लाडू करून द्यावें.

दुसरा प्रकार- गव्हांचे गोट भाजून चुरावे आणि त्यांत तूप व साखर किंवा गूळ घालून लाडू करून द्यावे. या खुराकांत तीन दिवसांनीं एकदा हळद, मिर्ये, तुरटी व निरफळें या समान औषधांची पूड एक तोळा पर्यंत घालीत जावी.

तिसरा प्रकार- तीळ चांगले निवडून तेल्याच्या घाण्यांत घालवून तेल सुटेपर्यंत मर्दन करावें म्हणजे गव्ह होईल तो कल्हईचे भांड्यांत भरावा आणि शेरीं अच्छेर प्रमाणें गूळ बारीक करून त्यांत मिश्र करावा. नंतर तें मिश्रण चार दिवस तसेंच ठेवून मुरल्यावर गुरांचे शरीरप्रमाणें नित्य सांजः काळीं एक शेरपासून दोन शेर पर्यंत द्यावें.

चवथा प्रकार- घोडे किंवा बैल यांचें शरीर पुष्ट होण्या करितां गव्हांचे फाडये ( गहूं भरडून एक वाण्यी-

चे दोन अथवा तीन तुकडे करून काढलेले ) सुमारें एक शेर पर्यंत कल्हईचे भांड्यांत दूध घालून त्यांत रात्रीं भिजत घालावें. प्रातःकाळीं त्यांतच आणखी दूध घालून तें मिश्रण त्याऊं घालावें. या प्रमाणें एक महिना हा खुराक नित्य दिला असतां तें गुरूं पुष्ट होतें.

ज्या वेळीं बैलांस अशा प्रकारचे खुराक द्यावयाचे असतील, तेव्हां आरंभी चार दिवस त्यांजकडून कांहीं काम घेऊं नये. नंतर नित्य थोडीशी रपेट करवून चार घटिका स्वस्थ बांधून ठेवावें. त्यांचे आंगास सुटलेल्या स्वेद (घाम) जिरून स्थिर झाल्यावर खुराक द्यावा. अशा प्रकारें केल्यानें तो खुराक सर्वांगांत भिनतो. आणि चांगला पचन होतो.

कित्येक लोक बैलांस फक्त तूप पाजितात, परंतु तेंच तूप त्यांस येण्या जोगे पदार्थांत मिश्र करून द्यावें. जसें मुगांचें वाफणें, गव्हांचे रोट इत्यादि चर्वणीय पदार्थांतून देत जावें.

बैलांस मठ, बाजरी, हरभरे वगैरे जो दाणा द्यावयाचा असेल, तो चांगला निसावा (निवडावा) त्यांत उंदरांच्या लेंड्या, रेंव व खडे अगदीं राहूं देऊं नये. नंतर तो दाणा भरडून त्यांत थोडें मीठ घालावें. आणि आंगावरोवर पाणी लावून दोन घटका दावून ठेवून मृदुता आल्यावर द्यावा

गाडीचे व नांगराचे बैलांस कांहीं कांहीं दिवसांनीं दारू पाजीत जावी. व हिंवाळे दिवसांत डुकराची चरबी म्हणजे

तेल मिळतें तें पाजावें. अथवा नारळाचा अंगरस काढून हळद, मिर्चे आणि तुरटी या समान औषधांची सुमारें एक तोळापर्यंत पूड घालून कच्चा एक शेरपर्यंत रस पाजावा. ह्या निर्दा पैकीं कोणतेंही औषध दिलें असतां, नितान दोन दिवस तरी त्यांस कोणत्याही कामास लावूं नये.

## गुरांकरितां चांगलें गवत.

गुरांस डोई तोंपर्यंत नित्य ओली चार, दूर्वा, दांतर, शिवण, हरिया इत्यादि झाडांचा पाला, रुजवून काढलेलें विलायती गवत हें घालण्यास हितकारक आहे.

शुष्कतृणाचे अंतर्भेद पुष्कळ आहेत; परंतु त्यांत मुख्यत्वें करून तीन भेद आहेत. ते- भाल्यण गवत, गत गवत आणि कडवा हे होत.

१- भाल्येण गवत (पराळ) ह्या गवतांत हलक्या भाताचें जें बारीक काडीचें गवत असतें, तें उत्तम. बाकींचीं ह्या पेक्षां मध्यम होत. भाल्येण गवतास पर्जन्यांत भिजूं देऊं नये. कदाचित भिजलें तरी तें तत्काळ पसरून चांगलें सुकविलें पाहिजे. ओल्या गवताची उडी केली असतां, तें कुजतें. त्यामुळें गुरें खात नाहींत. कुजलेल्या गवतांत, फेंसासारखे पांढरे व काजळाप्रमाणें काळे गठ्ठे म्ह० गोळ्या होतात. त्या गुरांचे खाण्यांत आल्या असतां अपकार करणाऱ्या आहेत.

२ गवतगवत- ह्यांत देशपरत्वें नांवांचे व जातींचेही पुष्कळ भेद आहेत. तथापि गोंडधेण, झिंजवा, तुरया, पश्यी व शेंगटा ह्या जातींचें गवत चांगलें होय. यांपैकीं कोणतेंही गवत जों पर्यंत त्याचे अंगीं ओलसरपणा (रस) आहे तोंपर्यंत स्वातीनक्षत्रांत कापून सुकून ठेवावें. तें चार पांच दिवस चांगलें सुकल्यावर पेंढ्या बांधून रचून ठेवावें. अशा प्रकारचें रसदार कापलेलें गवत गुरें झटून खातात. आणि तें निरोगी असतें. विशाखा नक्षत्राचा पर्जन्य गवतावर पडला असतां तें बाधक होतें, असें कांहीं लोकांचें मत आहे. परंतु इतकें तर अनुभवसिद्ध आहे कीं, असें गवत सुकून त्यांतील रस आटून गेल्यावर कापलें तर त्यांत सत्व (तेज) बिलकुल रहात नाहीं. ह्याकरितांच वर सांगितल्याप्रमाणें रसदार गवत कापून सुकवून ठेवावें.

३ कडबा- जोंधळ्याचा कडबा गुरांस घालितात. हा हितकारक, शक्तिदायक चांगला आहे. परंतु त्यांतून ही मुद्दाम कडबा तयार करण्याची अशी एक पद्धति आहे कीं, पर्जन्यकाळीं सर्व शेतांची पेरणी झाल्यावर गुरांकरितां एखादे शेतांत फार दाट पेरणीनें जोंधळा पेरितात. या योगानें त्याची बारीक कांडी येऊन कणसें ही बारीकच येतात. यापासून दाणे घेण्याचा उपयोग होत नाहीं. त्या कणसास फुटतां तो जोंधळा ओलसर असे पर्यंत तोडून सुकवून पेंढ्या बांधून ठेवाव्या. यास मुंड्यें किंवा बाटुक असें

म्हणतात. इतर कडब्यापेक्षां हा कडबा पुष्टिदायक, बलवर्धक, निरोगी असतो.

कोंकणप्रांतीं जोंधळ्याची शेती होत नाहीं. तथापि भरड जमिनीस घाटुक चांगलें होतें. हें अनुभवसिद्ध आहे.

कोंकणप्रांतांत वरी किंवा नाचणा यांचीं कणसें काढून घेतल्यावर जीं झाडें राहतात त्यांजला काड किंवा कडब म्हणतात. हा गुरांस घालितात; परंतु याचे आंगीं कस (शक्ति किंवा तेज) नसून फक्त निर्वाहाचा एक मार्ग आहे.

## बैलांची शुश्रूषा.

नित्य प्रातःकाळीं, रात्रौ बैल बांधलेले असतील त्या जाग्यावरून सोडून मोकळ्या जाग्यावर दुसरे जागीं बांधावे. आणि त्यांचे आंगास जे मलमूत्राचे डाग पडले असतील त्यांजवर रवनाची काळी गरम पाण्यांत कालवून सारवून ठेवावी (लेप द्यावा); आणि ती चांगली सुकल्यावर खरारयानें किंवा काथ्याचे आंग पुसणीनें चोळून टाकावी. या योगानें सर्व डाग निघून आंग स्वच्छ होतें.

जसा घोड्यास खरारा करितात, तसा बैलांसही खरारा करावा. व काथ्याचे पुसणीनें दुवक्त (प्रातःकाळीं व सायंकाळीं) आंग पुसून स्वच्छ ठेवावें. घोड्यांचे स्व-

ऱ्यास दांत तीक्ष्ण असतात. तसें बैलाच्या खराऱ्यास न ठेवितां अगदीं सूक्ष्म (आंगावर ओरखडे न उठण्याजोगे) ठेवावे. कारण घोड्या सारखी बैलाची लोंकर दाट असत नाहीं. बैलांस नित्य धुण्याचें कारण नाहीं; परंतु ज्या दिवशीं त्यांची मेहनत फार झाली असेल, त्या दिवशीं बैलाचें ऊन पाणी करून चांगलें धुवावें.

जे बैल पर्जन्यकाळीं नांगरास बांधितात. त्यांचे आंगावर कर्दम (चिखल) उडतो. ह्याकरितां नांगर सुटतांच बैलांचें आंगावरील चिखल नित्य स्वच्छ धुवून टाकावा. कारण तो आंगावर सुकल्या असतां लोंकर झडते. आणि बैल कुरूप होतात. व पायांत चिखल राहिल्यानें खुरें कुजतात. व कदाचित खुरांचे सांध्यांत खडा असल्यास तो घर करून इजा करील. याजकरितां प्रतिदिवशीं चारी पायांतील चिखल व खडा असल्यास काढून टाकावा.

## दुभत्या गुरांचें खाणें.

दुभत्या गाई किंवा म्हशी ह्यांस ओली चार, पेंड, कुळथांचें व करडये तिळांचे गुर्दी. तांदुळांच्या कण्या व दुसरे फेरणीनें तांदूळ कांडतेवेळीं जो पिठासारखा कोंडा येतो तो. यांपैकीं जें मिळेल त्याचें मिश्रण भिजवून घालावें. यास आंबोण म्हणतात. सरक्या घालणें झाल्यास त्याही भिजवूनच घालाव्या. फक्त सरक्या घातल्यानें

गाई व म्हशी यांचें दूध कमी होतें. परंतु इतर ग्वाण्या-पेक्षां दूध दाट होऊन त्यांत लोण्याचा अंश जास्त येतो. आणि लोणीही बहु येतें.

कोंडा म्हणजे तुरीच्या डाळीची चुरी अथवा हरभरे, मूग, उडीद इत्यादि धान्याची चुरीही साधारण पाण्यानें भिजवून मुरली म्हणजे ग्वाऊं घालावी. यापासून दूध जास्त येतें.

## म्हशी व रेडे यांचें पोषण.

म्हशी व रेडे आणि म्हशींचीं वासरें ह्यांचे अंगावरील केश (लव) वर्षांतून एकवेळ तरी काढून टाकावे. नाहीं पेक्षां वाढलेल्या केसांत कोळवा पडून फार त्रास देतात.

ज्या ठिकाणीं नदी व तलाव किंवा तलावडय असेल, तेथें नित्य म्हशी व रेडे यांस नेऊन सोडावें. म्हणजे तीं स्वेच्छेनें पाण्यांत बसतात. तेथें त्यांचें अंग स्वच्छ धुवावें. ज्या ठिकाणीं अशी सोय नसेल, तेथें थंड पाण्यानें नित्य रेडे व म्हशी आणि त्यांचीं वासरें धुवावीं.

चिखल व थंड पाणी हें रेडकांस फारच इष्ट असतें.

उन्हाळे दिवसांत रेडकांचे डोळ्यांतून उष्णानें मुळें पू येत असतो. त्यावेळीं त्यांचे मस्तकावर उंड्यांचें किंवा एरंड्यांचें तेल चोळून जिरवावें. व तांदुळांची पेज (कण्हेरी) पाजावी.

म्हशी व रेडे चरण्याकरितां सोडणें झाल्यास सकाः-

काळपासून सहा घटिकादिवस येई पर्यंतच सोडावीं. कारण प्रखर ऊन त्यांजला सहन होत नाहीं. पर्जन्यकाळीं प्रातःकाळपासून सायंकाळपर्यंत चरत असलीं तरी त्यां सहजा होत नाहीं.

लढाऊ रेडे तयार करणें असल्यास निरनिराळे दोन ठिकाणीं दोन रेडे अपरिचित बाळगावे. म्हणजे त्यांची एकमेकांशीं पूर्वीची संवय व ओळख असूं नये. त्यांजला सुगांचें चापणें वगैरे खुराक घालून चांगलें तयार करावें. परंतु लढाईचे प्रसंगावांचून त्यांची परस्परांशीं समदृष्टि होऊं देऊं नये. या प्रमाणें दोन्ही रेडे तयार झाल्यावर मैदानांत दोहों बाजूंनीं दोघांसही आणून एकदम त्यांची एकमेकांवर दृष्टि पोंचावी अशा बेतानें सोडले असतां एकदम मोठे त्वेषानें लढूं लागतात.

मस्त झालेले रेडे किंवा बैल यांजला काबूंत (स्वाधीन) ठेवण्या करितां नाकांत वेसण घालावी.

## बैल व रेडे ठेंचण्याचा काळ.

गाड्यांचे बैल व रेडे यांचे वृषणाच्या लंबक शिरा फांसानें किंवा दगडानें ठेंचतात यामुळें त्यांचें पुरुषत्व नष्ट होतें. आणि शरीरांत धातु संचय राहून सशक्त असतात.

बैल सातवे वर्षापासून आठवें वर्ष पूर्ण होईपर्यंत ठेंच-

नाना आणि रेडे दहावें वर्षांत ठेंचण्याचा प्रचार आहे. कित्येक धनगर वगैरे लोक ज्या वेळीं गाई वितात (प्रसूत होतात) त्याच वेळीं तिच्या गाईचा चीक (कोंवळें दूध) लावून लहानपणींच त्या वांसराच्या लंबक शिरा चोळून निर्वितात. तरुण बैल ठेंचण्यापेक्षां हा प्रकार बरा असें कित्येकांचें मत आहे.

प्रत्येक गांवीं एक एक वस्तु बैल जातवान थोराड व तसाच एक रेडा या प्रमाणें दोन्ही ठेंचल्या शिवाय मस्त सोडलेले असावे. म्हशी आपल्या ऋतूंत आल्यावर रेड्याकरितां अहोरात्र रेकतात (ओरडतात) त्या वेळीं रेड्यांचा व तसाच गाई फळणास आल्यावर त्यांजला बैलांचा उपयोग होईल. आणि अशा प्रकारें मस्त स्वेच्छाचारी रेडा व बैल यांचे सशक्त बीजापासून प्रजाही सशक्तच उत्पन्न होते. अशा प्रकारें रेडा व बैल सोडण्याचा, गुजराथ व कर्नाटक प्रांतीं प्रचार गांवोगांवीं असल्याचें कळतें. हा प्रचार सर्वत्र असणें हें हितकारक आहे.

## रोगी गुरांची शुश्रूषा.

कोणताही रोग झालेलें गुरूं सर्व गुरांत न बांधितां एकीकडे स्वतंत्र बांधावें. आणि त्याचे उपचार ज्या ज्या रोगाप्रमाणें जे जे करणें उक्त लिहिलेले आहेत. ते ते सर्व मनःपूर्वक करावे.

रोगी गुरूं उठवणीस आलें असतां दिवसांतून दोन वेळ त्याजला उठवून उभें करावें आणि चारीपायांवरून जोरानें वरून खालीं रगडीत यावें. व त्या गुरास चालण्याची शक्ति असल्यास सपाट (सारख्या) जाग्यांत दहा वीस पावलें तरी चालवावें. या योगानें, बसून राहिल्यामुळें शिरा आकर्षण होऊन आलेलें जडत्व कमी होतें. अशा प्रकारचें गुरूं चालविते वेळीं दोहों बाजूंस दोन असामी सशक्त असावे. त्यांनीं झोंक गेल्यास आधार द्यावा म्हणजे तोल सांवरतें आणि पडत नाहीं.

पायांचा रोग, मुसळा, जाळींद्र, लाळ्या रोग इत्यादिजे रोग स्पर्शजन्य आहेत. त्या कारणत्यादि रोगानें आजारी झालेलें गुरूं स्वतंत्र बांधून त्याचें उच्छिष्ट गवत, खाणें किंवा पाणी यांचा अन्य गुरांस वास सुद्धां घेऊं देऊं नये. रोगी गुरापुढील गवत (उच्छिष्ट राहिलेलें) जाळून टाकावें.

मुसळा झालेल्या गुराचें रोग व मृत मोकळ्या जाग्यावर न टाकितां जमिनींत खळगा खणून पुरून टाकावें. कारण त्याचा वास सुद्धां दुसऱ्या निरोगी गुरानें घेतां कामा नये. अशी तजवीज करणें हें हितकारक आहे.

आसपासचे गांवांत किंवा एकाच गांवांत परंतु ज्या कळपांतील गुरांस रोग झालेला असेल. त्या गुरांत आपलीं निरोगी गुरें मिसळूं नये. व परस्परांस स्पर्श हि करूं देऊं नये.

गांवांत रोगाची साथ आली असतां गुरांचे शक्तीप्रमाणें प्रत्येक गुरांस दोन तोळेपासून नवटांक पर्यंत प्रतिदिवशीं

एक वेळ आंबट लिंबाच्या अंगरस (पाण्या शिवाय काढलेला) देत ऱ्हावें.

नित्य प्रातःकाळीं व सायंकाळीं गंधकाची व उदाची अशा निरनिराळ्या धुऱ्या आपले गुरांस द्याव्या. उदाची धुरी गोठ्यांत अशी करावी कीं, सर्व गुरांचे श्वासोच्छ्वासानें थोडा तरी धूर त्यांचे मस्तकांत भरावा, व सर्वांगास ही लागावा.

मनुष्यांस जशी पटकी तसा गुरांस बुरसळा हा रोग आहे. याजकरितां धाम (रोगाची साथ) चालली असेल तेव्हां येतां जातां गुरांस पाणी पाजूं नये, व खुराकहि नियमित हलके पदार्थांचा असावा.

कित्येक गुरांस हाडें चघळण्याची संवय असते. याकरितां ज्या प्रदेशांत ढोर किंवा धेड्यांकांनीं मृतगुरांची निगत करण्याची चाल असेल तेथें त्यांजकडून रोगानें मृत झालेल्या गुरांच्या पोटांतील चारा (मल) व हाडें हीं एक खाडा खणून त्यांत पुरवून टाकावीं. अशी योजना केल्यानें तीं दुसरे गुरांस सांपडणार नाहींत.

## गाई व म्हशी यांस प्रसूतकाळीं जपणें.

गाई किंवा म्हशी गाभण असतां त्यांची खाण्यापिण्याची व्यवस्था चांगली ठेवण्याविषयीं पूर्वीं सांगितलेंच आहे. तशी नजरेंत ठेवून त्यांची प्रसूत होण्याची संधी आल्यावर पुष्कळ गुरांचे समागमांत त्यांस रात्रीं न बांधितां स्वतंत्र जाग्यांत बांधण्याची व्यवस्था ठेवावी. असें न केल्यानें कित्येक

अपघात असे घडतात कीं व्यालेल्या गाईचें किंवा म्हशीचें वासरूं दुसऱ्या गुरांचे पायांखालीं सांपडतें किंवा एखादें मारकें गुरूं असलें तर वासरास अनोळखीनें मारतें. इत्यादि कारणास्तव गाभण गुरें स्वतंत्र बांधलेलीं असावीं.

गाई व म्हशी यांचा प्रसूतिकाळ समीप आला असता गाभणपणीं त्यांचे स्तनांतून पिवळट रंगाचा द्राव, चिकट असतो. तो पातळ दुधासारख्या पांढऱ्या रंगाचा येऊं लागतो. जननेंद्रिय शिथिल आणि मोकळें होत जातें. दोन्ही बाजूंचे पोट अगदीं बसतात. शेपटीवरचे मणी निरनिराळे मोकळे दिसूं लागतात. श्वासोच्छ्वास कुंथल्यासारिखे येतात. पोटांत दुखूं लागलें म्हणजे वरचेवर बसतात आणि उठतात. शेपटी फिरवितात. व तीं जननेंद्रियाच्या एके बाजूस सरतात (वळतात). गवताचा एखादा घांस फार घाईनें खातात व मध्ये कांहीं वेळ स्वस्थ राहतात. हीं साधारण लक्षणें प्रसूतकाळचीं आहेत.

एखादें अशक्त झालेलें गुरूं असल्यास त्याचें वासरूं उदरांत पोसतें (मोठें होतें). व निःशक्ततेमुळें सुटका लौकर होत नसल्यास गव्हांच्या शेवया आधणांत शिजवून त्यांचें पाणी कच्चे चार शेरपर्यंत काढून त्यांत कच्चा पावशेरपर्यंत तूप घालून अगदीं कोमट झाल्यावर पाजावें आणि दहा मिनिटें अवकाश गेल्यावर वासराच्या खुरा दोन्ही हातांनीं धरून हळू हळू ओढावें म्हणजे त्वरित सुटका होते. हें कृत्य चांगलें सुज्ञ मनुष्यानें केलें पाहिजे.

वासरूं उपजतांच त्याचे चारी पायांचे खुऱ्यांस गर्भांत वाढलेली पांढरी मृदु गंठें असतात तीं तत्काळ नख्यानीं कुरतडून टाकावीं. कित्येक गाई किंवा म्हशी दांतांनीं आपणच तीं गंठें काढितात.

वासरूं उपजतांच तें त्यांच्या गुराच्या तोंडापुढें ठेवावें, म्हणजे तें गुरूं वासराचें सर्वांग चाटून स्वच्छ करितें आणि आपलें वासरास चांगलेपणीं ओळखितें.

गाई व म्हशी प्रसूत झाल्यावर त्यांची वार लवकर पडण्याकरितां कळकाचा ओला पाला व सालासुद्धां भात खाऊं घालावें. आणि वारेस एक सुमारें अच्छेरपर्यंत वजनाचें लांकूड किंवा दगड दोरीनें बांधावा. कित्येक लोक जोडा किंवा वाहाणादि बांधून ठेवितात. एकंदरींत वजन बांधणें हें खरें आहे.

वार पडल्यावर ती तत्काळ नेऊन जमिनींत पुरून टाकावी. त्यांच्या गुरांस खाऊं देऊं नये. वार पडल्यानंतर जननेंद्रिय आणि मागील बाजूचा कमरेपर्यंतचा भाग यांस खोबऱ्याचें किंवा तिळाचें तेल चांगलें लावून साधारण गरम पाण्यानें तो भाग चांगला शेकावा. आणि ओटी व सर्वांग स्वच्छ धुवावें.

वर सांगितल्या प्रमाणें सर्व व्यवस्था झाल्यानंतर प्रसवारम्भीं खाणें खावयाचें तें तांदूळ एक शेर व मेथ्या पावशेर यांचें भातापेक्षां पातळ व कण्हेरीपेक्षां घट्ट, त्यास घांटलें म्हणतात तें तयार करून त्यांत ओलें नारळाच-

कीस गूळ व तिळांचें तेल घालून तें निवाल्यावर (थंड झाल्यावर) ग्वाऊं घालावें.

दूध काढतेवेळीं प्रथमारंभीं आंचळ मृदु करून सर्व आंचळांतील थोंडें थोंडें दूध पिळून काढावें आणि आंचळ चालू झाला (दूध येऊं लागलें) म्हणजे वांसरूं लावावें. असें करण्याचें कारण हें किं- प्रथमच गुरूं व्यालें असतें तेव्हां त्याचे आंचळांत (दूध येण्याचे छिद्रांत) भेंड धरलेलें असतें तें भेंड वांसराच्या आकर्षणशक्तीनें निघत नाहीं इतकेंच नव्हे; तर मनुष्याच्या हि पिळण्यानें न निघेल तर सुईच्या टोंकेनें जसा कांटा काढितात, या प्रमाणें नजविजीनें आंचळाचे मुखास सुय लावून किंचित् विदारण करून जोरानें पिळावें म्हणजे भेंड (ग्वील) निघून दूध येऊं लागतें.

नित्य दूध काढून झाल्यावर ओंटी धुवावी आणि गोंचड्या असल्यास काढून टाकून सर्व ओंटीस कडू तेलाचा हात लावावा. या योगानें आंचळांस तडतडीतपणा येत नाहीं. व गोंचड्या ही चिकटत नाहींत.

## वांसरांची जतन.

वांसराचा जन्म होतांच त्याचे दोन्ही कान फुंकावे. व तोंडांतील मळ (बलक) वगैरे बोटानें काढून टाकावा. आणि पुढें त्या वांसरास दुधापासून दुधगा वगैरे विकार न होण्या करितां अन्मतःच मुरडशेंगीच्या झाडाचें (केवणीचें) मूळ थंड

पाण्यांत तीन मासेपर्यंत उगाळून एक तोळा पाणी करून पाजावें नंतर दूध पाजावें.

वांसरास दूध देणें तें जसजसें त्याचें वय अधिक होत जाईल तसतसें जास्त देत जावें. प्रथम एक एक ओंचळ द्यावा. नंतर दोन दोन द्यावे.

म्हशीचे वासरास दूध पाजून झाल्यावर लागलेंच दोन तोळेपर्यंत थंड पाणी पाजावें या योगानें म्हशीचे दुधांत जी चिकास असते ती वांसराचे पोटांत बसत नाहीं आणि खडा वगैरे धरत नाहीं.

वांसरें बांधण्याची जागा चांगली बंदोबस्ताची घराप्रमाणें असावी आणि वांसरांचे पायांखालीं व अंगाखालीं उंबीचे झाडाचा पाला हांथरून ठेवावा. या योगानें ऊब असते. आणि पिस्वा होत नाहींत.

वांसराखालील जागा नित्य दोन वेळ झाडून साफ करावी आणि चार चार दिवसांनीं जागा बदलून वांसरें बांधावीं. अथवा दिवसा एक ठिकाणीं व रात्रीं दुसरे जागीं. अशीं बांधिल्यानें जागा सुकी राहून त्यांस सुख होतें.

म्हशीचे वांसरांस कांबळ्याचा तुकडा जाळून त्याची राख कांहीं तीन मासे पर्यंत एक तोळा तिळाचे तेलांत कालवून दर आठवड्यांतून एक वेळ हें मिश्रण पाजीत जावें.

जशी मुलांस बाळघुटी तशी वांसरांस कृमि वगैरे न होण्याकरितां सांतविणाची साल व किराइताचा पाला यांचा रस काढून त्यांत सागरगोट्याचा गीर, पळसपापडी, ओंवा

आणि कारळयें (कडूजिरें) या समान औषधांची तीन मासे पर्यंत पूड मिश्र करून एक एक तोळा रस पाजावा. हें औषध महिन्यांतून दोन वेळ द्यावें.

ज्या वांसरास पोटभर दूध मिळत नसेल त्यास किंवा वांसराचें वय दोन किंवा तीन महिन्याचें झाल्यावर त्याजला नित्य पिठाचा रोट (जाड भाकरी) भाजून त्याजवर तिळांचें तेल घालून चुरा करून खाऊं घालावा. व असें थोर गुरांस वेळोवेळीं पाणी पाजणें व चारा घालणें त्या प्रमाणेंच वांसरां विषयीं ही चांगली नजर ठेवावी.

लहान वांसरांस दोरी लावल्या खेरीज मोकळीं सोडूं नयेत. कारण त्यांचे मस्तकांत मोकळी हवा भरल्यावर तीं पाहिजे तशा उड्या मारितात व अकस्मात बुजून कोठें तरी उडी मारतांच पाय फांकतात. अशा प्रसंगानें कित्येक पाय मोडून निरुपयोगी झालेलीं गुरें पाहण्यांत येतात. ह्या करितां ही सूचना अगत्याची आहे.

## गुरें विकत घेणारांनीं लक्ष्यांत ठेविण्याच्या गोष्टी.

जशा घोड्यांस बहात्तर खोडी असतात. तशाच कांहीं गुरांसही आहेत. परंतु त्या सर्व पहाण्याचा प्रचार नसून खालीं लिहिलेल्या मात्र अवश्य पहाव्या.

— कोणतेही गुरूं सतत मान फिरवीत रहातें अथवा

झुलत राहनें. तोंडांतून लांब जिव्हा बाहेर काढून वारंवार फिरविनें. रात्रीं विनाकारण हंबरतें (ओरडनें) मोठ्यानें घोरनें. ह्या लक्षणांपैकीं कोणतें ही लक्षण असल्यास तें गुरूं विकत घेऊं नये.

सर्व आंगाचा रंग काळा किंवा जर्दा अथवा तांबडा असून ज्याचा एकच पाय पांढरा असेल, तें व सतत विनाकारण डोळ्यांतून पाणी गाळीत राहणारें अशीं गुरें घेऊं नयेत.

ज्या गुराचे आंगावर चांदणीप्रमाणें फूल उठतें त्यास फुलकें असें म्हणतात. तें गुरूं घेऊं नये व घरचें असेल तर घरांत ठेवूं नये.

माघमहिन्यांत अथवा बुधवारीं अथवा मूळनक्षत्रावर (ज्येष्ठ महिन्यांतील गौरी आवाहनाचें मूळनक्षत्र) या दिवशीं व्यालेल्या म्हशी समजून उमजून घेऊं नयेत. व आपल्या व्याल्या असल्यास घरांत ठेवूं नयेत.

बैल घेणें तर तो अगदीं थंडा किंवा अतिशय तापट असूं नये असा पाहून घ्यावा.

खालीं मान करून नेटानें भार ओढणारा बैल, भारदारी गाड्या, मोट, नांगर यांस उत्तम होय. व वर मान करून चालणारा स्वारीच्या सारवट गाड्या, दमण्या, शिग्राम यांस योग्य होय.

बैलास स्वाभाविक चालवून पाहून ज्याचा मागील पाय पुढल्या पावलाच्या पुढें पडेल तो उत्तम. पुढील पाव-

ळांत मागील पाऊल पडेल तो मध्यम. आणि पुढील पावला मागें, मागील पाऊल पडत असल्यास तो कनिष्ठ होय. याच्यानें मजल करण्याचें काम कमी होईल.

वर सांगितलेल्या खोडी खेरीज फक्त बैलासच आणखी अशा खोडी असतात कीं, शिंगें उजळलेलीं म्हणजे पांढरे मोघ असलेले व पाठीवर कातर (लोंकरीचा आकार कात्रीप्रमाणें असतो) व खोंट लांडा म्हणजे घोंट्यावर शेंपटी असणें यांपैकीं कोणती ही खोड असल्यास तो बैल अगदीं घेऊं नये.

गुरें विकणारे लोक तें तयार दिसण्याकरितां रामेटी या झाडाचे पाल्याचा रस गुरांचे आंगास लावितात, त्या योगानें आंग सुजतें (थांथली येते) आणि पुष्ट असल्या सारखें वाटतें. परंतु हा रस लाविल्यानें गुरांचे आंगांत बारीक गांठी धरतात. याकरितां गुरूं घेतेवेळीं त्याचे आंगावरून जोरानें हात फिरवून पहावा आणि तसा प्रकार नसल्यास घ्यावें.

## गुरें घेण्यास व विकण्यास ज्योतिः शास्त्रमतें उक्त धरलेले दिवस.

सूर्यनक्षत्रापासून दिवसनक्षत्रापावेतों मोजावीं. प्रथमचीं चार यास आंतली चाल असें म्हणतात. गुरें देण्यास किंवा घेण्यास हे दिवस योग्य आहेत. त्या पुढचीं तीन न-

क्षत्रें वाईट. यांस बाहेरची चाल असें म्हणतात. ह्या बाहेरच्या चालीवर गुरें देऊं नयेत व घेऊं ही नयेत. याच क्रमानें चार चांगलीं, तीन वाईट अशा क्रमानें मोजून आंतले चालीचीं चार नक्षत्रें असतील, त्यांत व्यवहार करावा.

## गुरें बाळगणारांनीं अवश्य संग्रहास ठेविण्याच्या वस्तू.

हिंग, गंधक, ऊद, तुरटी, शुद्ध निंबाचें तेल, चांगली दारू (मद्य), हळदीची पूड, वडागरें मीठ, अळशी, कुळीथ, निरफळें, टकमकी कापूर, तपकीर, कारळयें, मिऱ्यें, मोहरी इत्यादि औषधें संग्रहास असावीं.

| | नांव | | आकृति. | नाला न्या |
|---|---|---|---|---|
| १ | गुरांस औषध पाजण्याचें घोटें (नाळ.) | १ |  | घोटें |
| २ | गुरांचे तोंडांत ज्ञान घालणें करितां वांक (छिद्र पाडलेलें लांकूड.) | २ |  | वांक |
| ३ | मोठे डाग देण्या करितां ढाणी (लोखंडी गायदुम केलेला गज.) | ३ |  | |
| ४ | गोलाकृती कच्चे किंवा पक्के डाग देण्याकरितां लोखंडी गजाची ढाणी. | ४ |  | |

५ बारीक रेषांचे डाग देण्या करितां पातळ पाठीचें खुरपें (कांयतें.)




## वर दाखविलेल्या आकृतींची समजूत.

**आकृति पहिली घोंटें-** गुरास कांहीं औषध पाजणें झाल्यास त्या गुराचे दोहों बाजूंस दोघांनीं उभें राहून एक एक हातानें शिंग धरावें आणि दुसरा हात गुरांचे आंठाखालीं घालून आंगठे गालफडांतून तोंडांत शिरवून तोंड उंच करावें. नंतर तिसरे मनुष्यानें घोंट्याचें बारीक तोंड (टोंक) गुरांचे तोंडांत घालून मोठें तोंड वर राहील त्यांत औषध योतावें.

सारखें **आकृति दुसरी बांक-** कोणत्या ही कारणानें गुरांचे तोंडांत हात घालून पहाणें झाल्यास वर सांगितल्या प्रमाणें गुरांचें तोंड उंच करून ह्या लांकडाची एक कड खालीं व दुसरी वर अशा प्रकारें तोंडाचीं दोन्ही जाभाडें उघडून त्यांत हें लांकूड द्यावें आणि तें परतूं नये याकरितां दोहों बाजूंच्या मुठी एकानें घट्ट धराव्या, नंतर लांकडाचे छिद्रांतून तोंडांत निर्भयपणें हात घालावा.

**आकृति तिसरी ढाणी-** गुरांस मोठे डाग देणें झाल्यास ही ढाणी टोंकाकडील बाजूनें तापवून मूठ हातांत धरून डाग द्यावे.

**आकृति चौथी बुटाची ढाणी-** कोणत्या ही जागीं

गोलाकृति डाग देणें झाल्यास ही ढाणी गोलाकडील बाजूनें तापवून डाग द्यावे.

**आकृति पांचवी खुरपें-** ह्या खुरप्याची पाठ (मागील बाजू) गायदुम पानळ असल्यानें कोणत्या ही ठिकाणीं बारीक डाग देणें झाल्यास ह्याचा चांगला उपयोग होतो. ह्या डाग देण्यानें फार सफाईनें लौकर हात ओढावा. असें न केल्यास, पाठ पानळ असते यामुळें गुरांस जास्त इजा होईल.

ह्या वस्तु संग्रहास असल्यानें पाहिजे तेव्हां उपयोगी पडतात.

एखादा रोग त्वरित व्यास होणारा झाल्यास त्या प्रसंगीं डाग देण्या करितां नवीन हत्यार तयार करविणें. अथवा दुसऱ्या कडून मागून आणण्यांत जो काळ जातो तितक्या अवकाशांत व्यास होऊन असाध्य होणारे रोग पुष्कळ त्या होत. यास्तव वर दाखविलेल्या वस्तु सर्वांनीं संग्रहास ठेवणें अवश्य आहे. हें सर्वत्र अनुभवी लोकांस विदित आहे. तेव्हां याविषयीं विशेष विवेचन करण्याची जरूर नाहीं.

---

## गुरांस होणारे रोगांची चिकित्सा (परीक्षा) आणि त्यांजवरील औषधें यांचें निरूपण.

### कुंदरोग.

अनियमित आहार व विहार यांजपासून जशी मनुष्याची

प्रकृति बिघडते; तशीच गुरांचीही बिघडते. सुका कोंडा, मृत्तिकामिश्रित गवत, क्षुधित असून पुष्कळ पाणी पिणें, फार मेहनत पडून पोटभर खाणें न मिळणें इत्यादि कारणांनीं उष्णता संयुक्त कोष्ठ कुपित होऊन कुंद या नांवाचा रोग गुरांस उत्पन्न होतो.

**लक्षणें-** कुंद झालेलें गुरूं सुक्या लेंड्या हगतें. दिवसें दिवस शक्तिक्षीण होऊन रोड होत जातें. सर्व दांत हालूं लागतात. यामुळें पेंडीचा खडा किंवा जाड गवत खाववत नाहीं. हा रोग जोंपर्यंत पक्क झाला नाहीं तोंपर्यंत औषध उपचार केला असतां त्वरित गुण येतो. वर्मीं औषध न पोंचल्यास जसा मनुष्यास क्षयरोग होऊन कांहीं दिवसांनीं योगानिध्य होतो, तसाच प्रकार या कुंदरोगाचा होत असतो. सारख्या रोगावर तीन महिनेपर्यंत औषधें लागू पडतात.

## कुंदरोगावरील औषधें.

१ माटगनार या झाडाचीं पानें लिंबिणीच्या पानांसारखीं असून हीं झाडें मोठीं होतात. पान चुरलें असतां दर्पयुक्त वास येतो. या झाडाचे पानांचा, पाणी घालून बारीक कुटून कच्चा पावशेर रस काढावा. त्यांत तिनकाच्च ओल्यानारळाचा आपरस (पाणी घातल्या शिवाय काढलेला) व दोन तोळे जगदळ्याचे सालीचा रस मिश्र करून त्या मिश्रणांत नवटांक गूळ कालवून प्रतिदिवशीं प्रातःकाळीं एक वेळ या प्रमाणें सात दिवस हें औषध द्यावें.

२ मुचकुंद या नांवचीं झाडें मोठमोठीं असतात. पानें पळसाच्या पानांएवढीं असतात. या झाडांस फुलें आठ अंगुळेंपर्यंत लांबीचीं जाड पाकळ्यांचीं येतात. त्या झाडाचे सालीचा रस कच्चा अच्छेर काढून त्यांत तितकाच नारळाचा आपरस घालून या मिश्रणांत सहा तोळेपर्यंत गूळ कालवून प्रतिदिवशीं एक वेळ प्रमाणें सात दिवस हें औषध द्यावें.

३ जशीं केतकीचीं झाडें असतात, तशींच जलाश्रित बोंडगी ह्या नांवाचीं झाडें असतात. आणि केतकी प्रमाणें या झाडांस हातें (कणसें) येतात. परंतु यास सुवास अगदींच येत नाहीं. हीं झाडें बहुतेक प्रांतीं आहेत. ह्या बोंडगीचे झाडांचा कवळ ह्मणजे ज्या ठिकाणीं पात्या येतात्याला कोंवळ्या पात्या अग्रास असतात, त्या काढून टाकून प. त्यातील गर्भाचा दांडा आणून बारीक कुटून पाणी घालून सुमारें दहा तोळे पर्यंत रस काढावा. त्यांत तितकाच नारळाचा रस व नवटांक गूळ कालवून प्रत्यहीं दोनवेळ प्रमाणें तीन दिवस किंवा सात दिवस, रोग निर्दोष होईपर्यंत द्यावा.

४ कुडयाचे (इंद्रजवाचे) झाडाच्या कोंवळ्या तुबऱ्या (टिकशा) बारिक कुटून पावशेर रस काढावा. त्यांत तितकाच नारळाचा रस व नवटांक गूळ घालून सात दिवस प्रत्यहीं दुवक्त हें औषध द्यावें.

## गालफोडी या रोगाचीं लक्षणें व

## उपचार.

चारा किंवा कोणताही पदार्थ खाईनें खाते वेळीं गालाचा आंतील भाग दाढेखालीं सांपडून चावण्यांत येणें, किंवा गवतांतून कांटा बोचणें अथवा कांहीं गुरांस हाडें चघळण्याची संवय असते, त्या एखादें हाडाचें टोंक गालास जोरानें लागणें इत्यादि कारणांनीं रक्त कुपित होऊन त्या जागीं तोंडांत आंतील बाजूनें (गालफडांत) नासलेल्या रक्ताची गांठ होते. ही प्रथम लहानच असते. परंतु दिवसें दिवस वाढत जाते, तीच मोठी होऊन दाटंन आली म्हणजे गालफड सुजतें. योगानें आंतून व बाहेरून तप्त होतें. यामुळें गुराच्यानें कांसाररखावचत नाहीं. व रवंथ करवत नाहीं. केव्हां केव्हां तोंड पसरतें. त्यांतून चिकट लाळ पडते. भक्षणीयपदार्थ पुढें टाकिला असतां त्यावर आसक्ति दाखवितें. परंतु तो त्याच्यानें खावचत नाहीं. या लक्षणांनीं हा रोग ओळखावा.

## उपचार.

मागें नंबर दोनच्या आकृतीचें लांकूड दाखविलें आहे तें रोगी गुराचे तोंडांत देऊन एक दाभण हातांत घेऊन त्या लांकडाचे भोंकांतून गुरांचे तोंडांत हात घालून दुसरे हातानें त्या गांटीचे बाहेरील बाजू जोरानें दाबून धरावी आणि ती गांठ दाभणानें फोडावी (क्षत करावें). नंतर दाभण टाकून

हळदीची पूड व मीठ एकत्र करून त्या गांठीवर जोरानें घर्षण करावें. मध्यें सुमारें पांच मिनिटें अवकाश गेल्यावर तुरटीच्या लाहीची बारीक पूड करून गांठीवर चोळावी. ह्याप्रमाणें उपचार केल्यावर सुमारें एक प्रहरांत गुरूं साधारण चारा खाऊं लागतें. दुसरे दिवशीं कांहीं कसर आहे असें वाटल्यास फक्त हळद व मीठ चोळून तुरटीच्या लाहीची पूड बसवावी. ह्या प्रमाणें दोन, तीन दिवस केलें असतां निरवालस गुण येतो.

**सूचना-** अविचारी लोक या क्षुल्लक रोगाचा पुरा तपास करून परीक्षा न करितां भलत्याच कल्पना चालवून पोटांत औषधें देतात. व त्याणें अपाय होतो. याकरितां याविषयीं चांगली नजर ठेवावी.

नाला

त्या

---

## विरली या रोगाचीं लक्षणें व उपचार.

जसें मनुष्याच्या नाकांत मोघ वाढतात, तसेच गाई, म्हशी, रेडे व बैल यांस उन्हाळे दिवसांत प्रखर उन्हाचा ताप लागून फार त्रास झाला असतां पर्जन्य पडून थंडाई आल्यावर शरीरांतील उष्णता बाहेर पडते. त्या योगानें नाकपुडींत कळा वाढल्या सारखा फोड येतो. याची परीक्षा करण्याचा असा प्रकार आहे कीं, उजव्या नाकपुडींत विरली झाली असल्यास डावे पाय व डाव्या नाकपुडींत झाली अस-

नां उजवा पाय (पुढचा किंवा मागचा) याची मूठ (खुरावरील भाग) सुजतो आणि फार संतप्त होतो. मुठींत व मुठीच्या बाजूंस फोड येतात. तेणें करून गुरूं फारच लंगडूं लागतें. याच लक्षणांनीं हा रोग ओळखावा.

## उपचार.

मोंगली एरंड, निवल, दिंडा, अथवा निर्गुंडी, या झाडां-पैकीं कोणत्या ही झाडाची सुमारें हाताचे बोटा एवढी मोठी व एक हात लांबीची सरळ काठी काढून तिजवरील त्वचा खर-डून काढावी. आणि दोहों बाजूंची चांगली टाप करावी. त्या टापेस व काठीस लोण्यांत हळदीची पूड कालवून लेप करा-वा. नंतर विरळी झालेल्या गुराचें तोंड उंच करून (उचलून) धरावें. पायांस फोड झाले असतील, त्याचे विषम बाजूचा का-न, नाकावर डोळ्यापासून सारखा परतून आणावा. आणि त्या कानाचें टोंक जेथपर्यंत येईल, तितकीच त्या काठीस खूण क-रावी. नंतर ती काठी मुठींत घट्ट धरून खूण केलेली असेल, तितकी (कानाचे अग्रापर्यंत) नाकपुडींत घालून सव्य अपसव्य साधारण जोरानें रगडून (दाबून) फिरवावी. म्हणजे तो कळा मोडतो आणि करकर असा शब्द होतो तेव्हांच काठी काढून घ्यावी. सुमारें दहा मिनिटें अवकाश गेला म्हणजे दर्द श्लेष्मरूप निघून जातो. रोग नूतन (कोंवळा) असल्यास दुसरे दिवसापासू-नच गुण वाटूं लागतो. व पक्क (जून) झालेला असल्यास वर सांगितल्या प्रमाणें तीन दिवस इलाज केला पाहिजे.

**दुसरा प्रकार-** विरली हा रोग होतांच जो पाय दुखत असेल, त्या पायांत पांढऱ्या गोकर्णीच्या वेलीचें कडें करून घालावें (पायांस वेलीचें वेष्टण करावें). व पांढऱ्या गुंजेच्या पाल्याचा रस सुमारें अर्ध तोळा, विषमनाकपुडींत पिळावा. हा रस नाकांत पिळतांच बैलाचें किंवा कोणत्याही रोगी गुराचें उचलून धरलेलें तोंड झटकन् सोडून द्यावें. याप्रमाणें तीन दिवस प्रत्यहीं दुवक्त उपचार केला पाहिजे.

## गुरांचे डोळ्यांत फूल पडतें किंवा सारा येतो त्याजवर.

डोळ्यांतील बुबुळावर अभाविन सारा आला पडल्यास तें व्यक्त दिसतें. याजकरितां त्या विषयीं विशेष विवेचन करण्याचें कारण नाहीं. आतां अशा प्रकारची व्यथा झाल्यास नित्य प्रातःकाळीं व सायंकाळीं पिंजर म्हणजे कुंकवाची पूड व्यथित डोळा उघडून धरून त्यांत भरावी. अथवा नाचण्याचें बारिक पीठ भरावें. या प्रमाणें कांहीं दिवस केलें असतां सारा व फूल झडतें.

## गुरांच्या जिभेस कांटे येतात, त्यांजवर.

गुरांची जीभ स्वभावतः खरखरीत असते; परंतु कांटे उठले म्हणजे जीभ फार तापते. आणि सुईच्या अग्राप्रमाणें तीक्ष्ण टोंक असून मुळांत जाड असे

काळे कांटे दिसूं लागतात. क्वचित् जिभेस चट्टेही पडतात. कांटे आलेलें गुरूं नित्य क्रमाप्रमाणें चारा खात नाहीं. स्तब्ध होतें. व राहून राहून तोंड उघडतें.

## उपचार.

उडदाच्या दाण्या एवढे मिठाचे खडे व हळदीची पूड एकत्र करून गुरांची जीभ गालफडाकडून बाहेर काढून त्याजवर हें मिश्रण घालावें आणि हातानें रगडून चोळून कांटे मोडून टाकावे. या प्रमाणें एक वेळ किंवा दोन वेळ करितांच गुरूं हुषार होतें.

## कर्णरोग (कोनें किंवा कान फुटणें) याचीं लक्षणें आणि उपचार.

कोनें या नांवाचा रोग बहुधा म्हशी व रेडे यांस फार होतो. गाई किंवा बैल यांस क्वचित् होतो. ह्या रोगाचें लक्षण (उत्पत्ति) अशी आहे कीं, मस्तकांत जंतू (कृमि) होते तेव्हां गुरूं कोणत्याही लांकडावर किंवा दरडीवर कपाळ केव्हां केव्हां आपटितें. तो कृमि आंतील बाजूनें कानास क्षत करितो. तेव्हां गुरें मागील पायानें तो कान वारंवार खाजवितात. याप्रमाणें होत असतां त्वरितच त्या कानांतून रक्त व पू यांचा स्राव होऊं लागतो. त्यास दुर्गंधी फारच असते त्यावेळीं पिचकारीनें किंवा तोंडांत गरम पाण्याची गुळणी (चूळ) भरून नेटानें बारिक धार का-

नांत मारावी. याप्रमाणें प्रतिदिवशीं दोन वेळ कान स्वच्छ धुऊन साफ ठेवावा.

## उपचार.

त्रिधारी अथवा चौधारी कांडवेल फोपाट्यांत भाजून रस काढावा. त्या रसांत काळ्या तुळशीच्या पाल्याचा रस व माक्याचा रस पाणी घातल्या शिवाय काढून मिश्र करून कान उचलून धरून आंत ओतावा. आणि चारी बाजूंनीं कानाची कातडी (त्वचा) वळवून ज्याप्रमाणें पुडी बांधितात. त्याप्रमाणें कपड्याचें वेष्टण देऊन कान बांधून ठेवावा. दुसरे दिवशीं वेष्टण सोडून पूर्वोक्तप्रमाणें कान धुवावा. आणि मायफळ व शंखजिरें यांची बारिक पूड करून क्षतावर बसवावी.

२ चिनें म्हणजे गोराडूं यांत कोनें या नांवाची एक जाति आहे. त्या जातीचें ठेंचून त्याचा रस काढावा, आणि कानांत घालावा. व त्याजवर हरकाचे (कोद्रूचे) तांदळाचा कोंडा कानांत भरून वर सांगितल्याप्रमाणें कान दुडून बांधून ठेवावा. तो दुसरे दिवशीं सोडून आंतील औषध काढून टाकून कान स्वच्छ धुवावा. नंतर उंडयाचें किंवा एरंडेल तेल कानांत घालून दोन तासपर्यंत कान बांधून ठेवावा. तो पुनः सोडून वर सांगितलेला रस व हरकांचा कोंडा भरावा. ह्याप्रमाणें तीन दिवस उपचार केला असतां गुण येतो.

३ कोष्टकोळिंजनाचा रस व लिंबाचा रस एकत्र करून

कानांत घालावा. आणि वर आंबळकांदीची वस्त्रगाळ पूड करून भरावी. नित्य पूर्वीचें औषध काढून टाकून कान धुवावा आणि पुन्हा हेंच औषध भरावें. याप्रमाणें तीन किंवा ५ दिवस केल्यानें गुण येतो.

## कोंचें या रोगाचें लक्षण आणि उपचार.

गुरांचे नरडीचा जो हरडा आहे त्याचे वरील बाजूस टाळ्यांत पडजिभेच्या खालीं एक गांठ आहे तीस लोळा म्हणतात. सतत निरोगी गुरांचा लोळा साफ असतो. परंतु कधीं कधीं या लोळ्यास कांटे येतात. हे बहुधा भर उमरीच्या तारुण्यांत प्रत्येक गुरांस येतात. व केव्हां केव्हां अति उष्मतेपासून ही येतात. या रोगानें गुरांचा गळा नरम होतो. रवंथ करण्यास, ग्रास वर काढण्यास महत्प्रयास पडतात. घांस गिळवत नाहीं. या रोगाचें गुरूं गवत किंवा कोणताही भक्षणीय पदार्थ तोंडांत घेऊन चर्वण करितें. परंतु एक घांस गिळण्यास वीस मिनिटें अवकाश लागतो. यामुळें त्याची पोटभरणा न होऊन दिवसें दिवस क्षीण होतें. या रोगास कोंचें किंवा टाळ्यांत केंस आले असेंही ह्मणतात.

## उपचार.

आकृति नंबर दोन हें लांकूड गुराचे तोंडांत देऊन लांब हात घालून पहावें. म्हणजे बोटाचे अग्रास लोळा लागतो त्या लोळ्यास तांदळा इतके लांब मृदु तीक्ष्ण असे कांटे आ-

लेले स्पष्ट फोटांस लागतात. याप्रमाणें परीक्षा जाहल्यावर घोंटवेलीची एक पेराची काठी काढावी. या वेलीचे प्रत्येक पेरास सभोंवती बारीक कांटे असतात. या कांट्याची ओढ बाहेरच्या बाजूस करून ती काठी तोंडांत घालून टाळ्यावरून पांच किंवा सहा वेळ साधारण दाबून ओढावी. (खरवडावें.) ह्मणजे कांटे मोडतात. नंतर लोण्यांत हळदीची पूड कालवून तें मिश्रण हातानें त्या जागीं लावावें. ह्याप्रमाणें उपचार केला असतां दोन प्रहरांत आजारी गुरूं चांगलें बरें होतें.

## शेंबा या रोगाचीं लक्षणें आणि उपचार.

जसा मनुष्यास श्लेष्म तसा गुरांस शेंबा होतो. हा होण्यापूर्वी गुरांस एक दिवस चांगला ताप येतो. तेव्हां गुरूं आंगाची लव (शेंकर) फुलवितें. आणि पाठीचे कण्यावर मध्यभागीं किंचित उंचवटा दाखवितें. प्रथम एक दोन दिवस नाकांतून पातळ पाण्याचा स्राव होतो. नंतर दाट शेंबा पडूं लागतो. शेंब्याचा रंग पांढरा किंवा पिंवळट पांढरा असा असतो. मस्तकांतील मेंदू तप्त होऊन दूषित झाल्यानें हा रोग होतो. गुरांचा शेंबा लौकर बंद होण्याविषयीं प्रयत्न करावा. नाहींपेक्षां एखादे नाकपुडींतून जन्मभरही वाहत राहण्याची भीति असते. व त्यास पुढें फारच दुर्गंधी येऊं लागते. तेंव्हां घर्ण झाला असें ह्मणतात.

## उपचार.

१ पांढरे कांदे सात व गूळ पावशेर या प्रमाणें प्रत्यहीं प्रातःकाळीं तीन दिवस खाऊं घालावें. आणि फार दिवशी जुना सरक्या काढलेला कापूस ( रू ) असेल तो घेऊन स्वच्छ मोकळा करून त्याची सुमारें हाताचे मनगटाएवढी पेळू (वात ) करून एका अग्रास अग्नी लावावा. आणि त्यांतून निघणारा धूर त्या गुराचे श्वासोच्छ्वासानें मस्तकांत जाऊं शकेल अशा बेतानें ती धुमती वात गुराचे नाकापुढें धरावी. ह्या प्रमाणें प्रतिदिवशीं प्रातःकाळीं व सायंकाळीं तीनरोज केलें असतां त्वरित गुण येतो.

२ कवड्या उदाचा धूर श्वासोच्छ्वासानें नाकांत जाण्या योग्य धुरी द्यावी.

## कांटील या रोगाचें लक्षण आणि उपचार.

कांटील हा रोग गाई, म्हशी, बैल व वांसरें या सर्व गुरांस होतो. गळ्याखालीं जो नरडीचा हरडा (मणी ) आहे, तो निरोगी गुरांचा लहान कवंठाएवढा असतो. परंतु कोणत्याही कारणानें जेव्हां त्या हरड्यास दुखापत होते अथवा अति उष्णतेमुळें वरील नांवाचा रोग होतो. तेव्हां तोच हरडा आंतून सुजतो. व बाहेरून ही सूज येते. आणि त्या मुळें सुमारें लहानशा नारळा एवढा दिसतो. व त्या हरड्यास ज्या नरडीच्या दोहों बाजूंच्या शिरा मिळून गेलेल्या आहेत, त्याही सुजतात. आणि तप्त होतात. यामुळें गुरांच्यानें ग-

वत किंवा कोणताही पदार्थ खाववत नाहीं. जीभ आकर्षण झाल्याप्रमाणें होऊन जिव्हेच्या मुळांतून कळा येतात. यामुळें दूध पिणारीं लहान वांसरें असल्यास क्षुधित असल्यामुळें आंचळास तोंड मात्र लावितात. परंतु तो तोंडांत धरून त्यांच्यानें दूध पिववत नाहीं. हा रोग समजण्यांत न येतां पांच सात दिवस उपोषण झाल्यानें गुरें शक्तिहीन होऊन उठवणीस येतात. आणि त्यांतच त्यांचा अंत होतो. यास्तव अशा रोगाविषयीं गुरें बाळगणारांनीं चांगली नजर ठेविली पाहिजे.

## उपचार.

सुजलेल्या हरड्याच्या दोहों बाजूंनीं दोन अंगुळें अंतरावरून शिरा गेलेल्या असतात. त्या स्वस्थ मनानें हातानें दाबून पाहिल्या असतां नाडीप्रमाणें ठणात्कार(उडत.) असल्यानें समजण्यांत येतात. त्या शिरांस हरडा मध्यभागीं सोडून हरड्याच्या मागें व पुढें तीन तीन अंगुळांच्या अंतरावर दोहों बाजूंस मिळून आरुति नंबर चारच्या बुटाच्या टाणीचे डाग द्यावे. हे डाग फार सरवर व फार सौम्य नसून मध्यम असावे. परंतु लहान वांसरांस असे डाग न देतां एका लोखंडी खिळ्याच्या अग्रास भिलावा ( बिब्बा ) टोंचून तो दिव्यावर धरावा. आणि चांगला तप्त होऊन पेटूं लागला म्हणजे त्याचे चपके ( कच्चे डाग. ) द्यावे. हे डाग वर्मी शिरेवर बसल्यास आठ प्रहरांत चांगला गुण येतो.

## सडी ह्या रोगाचीं लक्षणें आणि उपचार.

सडी हा रोग बहुत करून गाईचे लहान वांसरांस होतो. दूध पिणारे वांसरांस सहा महिन्यांचे आंत नाक भात वगैरे उच्छिष्ट अन्न खाऊं घातल्यानें हा रोग होतो. ह्याची उत्पत्ति दोन्ही डोळ्यांचे नाकाकडील बाजूचे कोंपऱ्यांत डोळ्यांतील पांढऱ्या कवडीवर कोंपऱ्या बरोबर तांबड्या रंगाचें मासरूड हें सर्व गुरांस असतें. परंतु ज्यावेळीं वरील नांवाचा रोग होतो त्यावेळीं तेंच मासरूड वाढत वाढत सुमारें एक अंगूळ पर्यंत पुढें येतें. आणि या मासरूडाचे पुढील भागाची रेषा किंचित् तांबूस आणि काळसर रंगाची होते. हा रोग होतांच वासराचे पुस्कुरीवरील व जागोजाग सर्वांगावरील आणि शेंपडीवरील केश झडून जाऊं लागतात. केश गेलेल्या जागीं पांढरे चट्टे पडतात. हा रोग पक्क झाल्यास घातकच आहे. हा रोग झालेल्या वांसरांस अन्न अगदीं घालूं नये.

### उपचार.

सडी हा रोग झालेल्या वांसरास एका कुशीवर निजवून जमिनीवर त्याचें मस्तक दाबून धरावें व एका मनुष्यानें वासराचा डोळा उघडून धरावा. आणि ज्याचा हात कांपत नसेल,व जो या कामांतील माहितगार असेल अशा मनुष्यानें डोळ्यांची पांढरी कवडी आणि वाढलेलें मासरूड यांच्या दरम्यान सांध्यांत सुईचें नेढें किंवा सळी घालून वाढलेलें निनकेंच मासरूड किंचित् वर उचलावें. आणि चांगल्या धा-

रेच्या शस्त्रानें त्या मासरुडास छेद करावा. (कड कापून टाकावी.) हें मासरुड कापून निराळें करून काढून टाकण्याची जरूर नाहीं. फक्त छेद झाला म्हणजे त्याची वृद्धिंगत होण्याची शक्ति नाहींशी होते. या प्रमाणें छेद केल्यावर लोणी आणि हळद त्या जागीं लावावीं. याप्रमाणें उपचार करतांच चार दिवसांत, हा रोग झालेलें गुरूं अगदीं निरवालस बरें होतें. व कांहीं दिवसांनीं गेलेले केंशही येतात.

## नरडपेच या रोगाचीं लक्षणें आणि उपचार.

प्रत्येक गुराचे टाळ्यापासून चुनाळ्यापर्यंत, जशी गोल कड्याची सांखळी असते, त्याप्रमाणें शिरांच्या वेष्टनाची एक मोठी नळी असते, आरोग्य गुरांचे नळीस हात लावून पाहिला असतां तिचा प्रत्येक सांधा हातास व्यक्त लागतो. परंतु कोणत्याही कारणानें गुरांस सरदगर्मी जाहल्यास हीच नळी कठीण होते. आणि सांधे हातास व्यक्त लागत नसून एखाद्या काठीप्रमाणें ताठ (कठीण) झालेली असते. या रोगास नरडपेच असें म्हणतात. हा रोग झालेलें गुरूं रवंथ करीत नाहीं. गवत किंवा कोणताही कठीण अथवा चिंवट पदार्थ त्याच्यानें गिळवत नाहीं. फक्त पाणी मात्र मंद, मंद (हळू हळू) पितें. या रोगाचा उपचार वक्तशीर न झाल्यास त्या नळीचा वाहकपणा बंद होऊन गुरें मरतात. रोग झाल्या दिवसापासून तीन दिवसपर्यंत औषधाउपचार लागू पडतो. नंतर रोग कष्टसाध्य होतो आणि वाहकपणा बंद झाल्यावर डाग देणें या शिवाय दुसरा उपाय करणें निरर्थक

आहे. डाग देऊनही एखाद्याच गुरास गुण येतो. डाग देणें झाल्यास नरडीच्या नळीचे दोहों बाजूंनीं एक, किंवा दोन अंगुळांच्या अंतरानें सरळ रेषा (उभे) खुरप्याच्या पाठीचे बारिक डाग द्यावे. हा शेवटचा उपाय होय.

## उपचार.

कठीण झालेल्या नळीच्या दोहों बाजूंच्या शिरा धरून टाळ्याखालीं १ व मध्यभागीं हरड्याच्या खालीं एक व तेथून चार अंगुळांच्या अंतरानें एक. याप्रमाणें एक बाजूस बुटाच्या टाणीचे गोलाकृति तीन डाग द्यावे. नंतर दुसऱ्या बाजूसही तसेच तीन डाग द्यावयाचे. परंतु पहिल्या डागांच्या समोरच न देतां कांहीं विषम भागानें द्यावे. नंतर गव्हांचे भरड्याची पातळ कण्हेरी करून थोडा गूळ कालवून निरफळें, सुंठ, कोष्टकोळिंजन या समान औषधांची पूड एक तोळा व तूप नवटांक याप्रमाणें त्या कण्हेरींत मिश्र करून पाजावी. हा रोग झालेल्या गुरांस तीन दिवसपर्यंत पाणी पाजूं नये. त्याअभावीं कण्हेरीच द्यावी.

२ ओंवा तोळा एक, लवंग तीन मासे, दालचिनी सहा मासे, मिऱ्यें सहा मासे, कडू वृंदावन तीन मासे, तेरड्याचें बीं एक तोळा, कारळें तीन तोळे, व कमळकांकडीचा मगज (गीर) चार तोळे. या औषधांची एकत्र बारीक पूड करून अष्टमांश हळदीची पूड मिश्र करावी. आणि प्रतिदिवशीं प्रातःकाळीं व सायंकाळीं चार तोळे गूळ अच्छेर पाण्यांत कुचकून तें पाणी कपडछाण करावें. नंतर त्यांत वर सांगितलेल्या औषधांचे पु-

डीपैकीं दोन तोळेपर्यंत गुरांचे शक्तीप्रमाणें पूड घालून हें मिश्रण पाजावें. ह्याप्रमाणें तीन दिवस.

वर गव्हांची कण्हेरी द्यावी, असें सांगितलें आहे. परंतु गहूं न मिळाल्यास तांदुळांची द्यावी. मात्र त्यांत गूळ दुप्पट असावा. व औषधांची पूड चार तोळेपर्यंत घालावी. आणि फार थंड न होऊं देतां कोंबट द्यावी.

हा रोग झालेल्या गुरांस गवत वगैरे खाऊं लागल्यावर चवथे दिवसापासून पाणी द्यावयाचें तें चांगलें तापवून (गरम करून) निववावें. आणि अगदीं कोमट झाल्यावर त्यांत थोडा गूळ कालवून द्यावें. परंतु अशा प्रकारचें पाणीही एकदम न पाजितां दोन नांवे, (दहा शेर.) पर्यंत द्यावें. रोग निस्तोष झाल्यावर पाहिजे तितकें दिलें तरी चिंता नाहीं. हें पाणी देणें तें प्रातःकाळ सायंकाळ व रात्र खेरीज करून दिवसा द्यावें.

## रोडमाणकें या रोगाचीं लक्षणें आणि उपचार.

हा रोग वासरांसच होतो असें नाहीं. लहान व थोर सर्व गुरांस होतो. याचीं कारणें अशीं आहेत कीं, लहान वासरांस त्यांचे क्षुधेप्रमाणें दूध न देतां सर्व दूध काढितात; यामुळें त्यांची पोटभरणा न होऊन त्यास आलेली क्षीणता दुःसह होऊन व गुरांचीही खाण्यापिण्याची व्यवस्था नीट न राहिल्यानें किंवा रोगग्रस्त गुरूं असतां त्याजला कण्हेरी वगैरे न पाजल्यानें त्याच्या आंगीं चारा वगैरे खाण्याची शक्ति नसते. यामुळें क्षीणता येऊन गळ्या खालील सांखळ सुजते. व गालफडें सुजल्यासारखीं दिसतात. हीं प्रथमचीं लक्षणें आहेत.

इतक्याही संधींत त्याची शुश्रूषा चांगले प्रकारें न केल्यास तें अल्प दिवसांतच उठवणीस येतें. आणि फार हाल होऊन त्यांतच त्याचा अंत होतो. चांगली जतन न करण्याचा, हा परिणाम आहे. याकरितां आरंभीं जी साधारण नियमांची व्याख्या लिहिली आहे त्याप्रमाणें तरी गुरांची व वासरांची अवश्य जतन करावी.

## उपचार.

ह्या रोगाचा प्रादुर्भाव (उद्भव झाल्याचीं चिन्हें) दिसूं लागतांच त्या गुराचे गळ्यांत नारळाची करवंटी तीन डोळ्यांची (वरच्या बाजूची) दोरीनें ओंवून गळ्यांत बांधावी. हा एक तोडगा आहे. व उकड्या सडिक तांदुळांचा कोंडा किंवा नाचण्यांचें बारिक दळलेलें पीठ यांची आंबिल (गवती) करून साधारण गरम असें पर्यंत सुजलेल्या भागास लेप द्यावा. हे बाह्योपचार होत. परंतु शक्ति वाढण्याकरितां गव्हांचे पिठांत तुपाचें मोहन घालून रोट भाजावे. आणि त्यांचा चुरा करून त्यांत तूप व गूळ घालून लाडू करून गुरांचे शक्तीप्रमाणें प्रातःकाळीं व सायंकाळीं देत जावें. व एक दोन दिवसांनीं रोगी गुरांस कोंबट पाण्यानें धुवावें. वारंवार जागा बदलून बांधावें. आपण बरोबर राहून व्यायाम करवावा. कदापि उठवणीस आलें असल्यास दिवसांतून दोन वेळां उचलून उभें करीत जावें व नित्य शक्तिदायक पदार्थ खाऊं घालावें. याप्रमाणें उपचार करून साधारण गुण वाटूं लागला म्हणजे हरभऱ्यांची डाळ भिजवून त्यांत नारळाचा कीस घालून द्यावी.

## दुधगा या रोगाचीं लक्षणें आणि उपचार.

दुधगा हा रोग म्हशीचे व गाईचे वांसरांस होतो. हा रोग दुधाच्या विकारानें पोटांत बसून जसा लहान मुलांस मु-आरकीनामक रोग होतो, तद्वतच हा रोग होतो. याजकरितां म्हशीचे वांसरांस दूध पाजल्यावर थोडें पाणी पाजीत जावें. दुधगा झालेसीं वासरें पोट फुगवितात व म्लान असतात. या रोगाची पोटांत गांठ धरते त्यामुळें मलावष्टंभ होतो. तेव्हां महत्प्रयासानें वांसरें हगतात. त्याचा रंग केवळ खडूप्रमाणें गळमिश्रित असतो. आणि दुर्गंधीयुक्त चिकट बुळबुळित असून हा मळ वासराचे आंगास लागला असतां त्या भागाचे केश झडतात. रोगी वांसरांची इच्छा दूध पिण्यावर नसते. ह्या रोगावर उपचार न केल्यास पोटांत धरलेल्या मळाचा सांठा केवळ खापरा प्रमाणें घट्ट होऊन मळद्वार व्यापितें (बंद होतें.) नंतर यत्न चालत नाहीं. आणि त्यानेच त्यांचा अंत होतो.

### उपचार.

कारळीं (कडू जिरें) या झाडाचे पाल्याचा रस पावशेरपर्यंत वांसराचे शक्तीप्रमाणें काढून त्यांत सागरगोट्याचा गीर व थोडी मिरपूड घालून द्यावा. ज्या ठिकाणीं ओलीं पानें न मिळतील, तेथें कडू जिरें एक तोळापर्यंत साधारण कुटून त्याचा काढा करावा. ह्या काढ्यांत सागरगोट्याचा गीर व खैराची साल उगाळून पाजावा.

२ दुधेली (दूधवेल) याविषयीं आम्ही केलेल्या अन्वेष-

धिप्रकाश ग्रंथांत आकृति दाखविली आहे. ह्या वेल्हीचीमुळी थंडपाण्यांत एक तोळापर्यंत उगाळून प्रतिदिवशीं एक वेळ ह्या प्रमाणें सात रोज दिल्यानें पोटांतील सर्व भार निघून जाऊन रोग अगदीं निर्मोष होतो.

३ केवर्णाची (मुरडशेंगेची) मुळी थंडपाण्यांत तीनतोळेपर्यंत उगाळून त्यांत सोनविणाचे मालीचा रस निरकाच मिश्र करून थोडा हिंग लावून हें मिश्रण प्रतिदिवशीं दुवक्त प्रमाणें तीन किंवा पांच दिवस द्यावें.

४ वर सांगितलेलीं औषधें नच मिळतील तर रेच होण्याचें सूक्ष्म औषध देऊन नित्य मलशुद्धी करीत रहावें. आणि इंद्रजव, कुटकी, किराईत इत्यादि कटु औषधें मिश्र करून गुण येईपर्यंत नित्य देत रहावें.

## खडा धरल्यास त्याजवर उपाय.

खडा धरणें हा विकार रेडकांस (म्हशीच्या वांसरांस) फार होतो. व क्वचित् गाईचे वांसरांस ही होतो. हा खडा संचित मलाचा अवरोध झाल्यानें होतो. यामुळें शौचास साफ होत नाहीं. वारंवार वांसरूं कुंथून यत्न करितें परंतु खडा न पडल्यानें त्याचे फार हाल होतात. क्षणभरही चैन पडत नाहीं. खाण्याकडे व पाणी पिण्याकडे त्यांचें अगदीं लक्ष लागत नाहीं.

## उपचार.

खडा धरलेल्या वांसरास किंवा गुरांस त्याचे शक्तीप्रमाणें शुद्ध लिंबांचें तेल पाजावें. व एक कांदा साधार-

ण फोडून तो मलद्वारांत कांहीं वेळ घालून ठेवावा. नंतर कांदा काढून गांवठी साबू व प्रज्वलित अग्नीचा इंगळ (निखारा.) एकत्र उगाळून मलद्वारांत करांगुळीनें लेप द्यावा. मोंगली एरंडाचे पानाचा देंट चिका सुद्धां मळद्वारांत एक दोन वेळ चाळवावा. याप्रमाणें इलाज करतांच खडा द्वाराजवळ येईल तो चिमट्यानें काढून टाकावा. खडा काढून टाकितांच गुरूं किंवा वांसरूं त्वरित हुषार होतें.

## शेंपसरडें ह्या रोगाचीं लक्षणें आणि उपचार.

शेंपसरडें हें लहान वांसरांस व गुरांस ही होतें. त्याचें लक्षण असें आहे कीं, शेंपडीचे गोंड्यास (अग्रास) कीड लागते. आणि अग्रापासून शेंपडी कुजण्यास प्रारंभ होतो. नंतर थोडेच दिवसांत शेंपडीचे सर्व केश झडून जातात. आणि दिवसें दिवस शेंपडी कुजून झडत जाते. या रोगास उपचार न केला तर शेंपडी मुळापर्यंत झडून जाईल. आणि सर्व शरीरांतील रक्त त्या द्वारानें वाहून जाईल.

## उपचार.

शेंपडीचें अग्र ज्या जागीं कुजलें असेल तेथें शस्त्रानें चिरून (उभा छेद करून) लोखंडाचे पळींत तिळांचे तेल चांगलें तप्त करून (तापवून) ती जागा तळून काढावी. या योगानें त्या ठिकाणींच कीड मरून जाते. आणि रोग निखालस बरा होतो.

## ढेंगमोडें या रोगाचें लक्षण आणि उपचार.

ढेंगमोडें याचें लक्षण असें आहे कीं, एकाएकीं गुरांस ताप भरभर येतो. श्वासोच्छ्वास फार गरम येता-त. केव्हां दचकल्या सारखें आंग काढितें. बसलेलें अस-ल्यास अकस्मात घाईनें (घाबरेपणानें.) उठतें. व पुन्हा बसतें. तेव्हां चारी पाय पोटाजवळ धरून मान पोटाव-र परतून घेऊन राहतें. ज्यावेळीं शरीरांतील ताप एक-दम निघून जातो. त्याचवेळीं वातसंचार होऊन सर्व शि-रा आकर्षण होतात. सर्व सांधे अगदीं विगलित झा-ल्या सारखे होतात. त्यामुळें उठतां येत नाहीं. उचलून उभें केलें तरी त्याच्यानें जमिनीवर पाय टेंकवत नाहीं. व पायांवर जोर घेववत नाहीं. हा रोग कष्टसाध्य आहे. रोग झाल्यापासून चार दिवसांत गुरें मरतात. परंतु जों पर्यंत त्याचे शिरांतील वाहकपणाचा व्यापार मंद झाला नाहीं, तों पर्यंत म्हणजे रोग झाल्या पासून निदान तीन प्रहरांत उपचार केल्यास लागू पडतो. अशा रोगांतून निभावलेल्या गुरांकडून चार महिनेपर्यंत मेहनतीचें काम अगदीं घेऊं नये. या रोगाची साथ जशी गुरांस येते तशी-च मनुष्यांसही येते. तेव्हां डुटयें असें म्हणतात. आणि गुरांस झाला असतां ढेंगमोडें म्हणतात.

### उपचार.

१ ढेंगमोडें झालेल्या गुरास छत्तिसा डाग द्यावा. छत्तिसा डाग म्हणजे कपाळावरून डाग ओढण्यास प्रा-

रंभ करावी तो मानेच्या बाजूनें पुढल्या पायांच्या फऱ्यावरून, पोटावरून व मळद्वारा खालून मागील बाजूच्या पायांचे फऱ्यावरून सर्वांगाचे सभोंवती नेऊन आरंभ केलेल्या जागीं मिळवावा. (सर्वांगास प्रदक्षिणाकृति डाग द्यावा) या योगानें सर्व शिरांत उष्णता पोंचून वायूनें आकर्षण झालेले संधी (सांधे.) मोकळे होतात.

२ रोगी गुरूं छतिसा डाग सहन करण्यायोग्य सशक्त नसेल तर पांढरा चांफा (रुखचांफा) याच्या सुमारें पायांचे आंगठ्या एवढ्या दोन हात पर्यंत लांबीच्या पांच काठ्या (ताज्या फांकाट्या) आणून त्याचे मध्यभागीं शेणाचा अग्नि करून चांगल्या भाजत आल्या म्हणजे एक एक, काठी काढून भाजलेल्या जागीं एका घावानें तोडून दोन भाग करावे. आणि दोन्ही भागाचीं तोडलेलीं तोंडें त्यांतून तीक्ष्ण वाफ येत असे पर्यंत फार त्वरित नेऊन प्रत्येक सांध्याच्या शिरेवर दाबून धरावीं. पुनः आणखी चार अंगुळें अंतरानें छेद करून त्याच काठीचे दोन्ही तुकड्यांचे दुसऱ्या जागीं चपके द्यावे. या प्रमाणें त्या काठींतून वाफ येत असे पर्यंत, तीन किंवा चारही चपके देतां येतात. या प्रमाणें शरीरांतील मुख्य मुख्य शिरांवर प्रदक्षिणाकृति चपके द्यावे. यांस चोऱ्यांचे डाग किंवा चोरे असें म्हणतात. गाभण्या गाई अथवा म्हशी आणि वांसरें यांस चोऱ्यांचाच उपयोग करावा.

ढेंगमोडें झालेल्या गुरांस वर लिहिल्याप्रमाणें डाग देऊन झाल्यावर प्रतिदिवशीं दोन वेळ उदाची धुरी द्यावी. की अ-

शा प्रकारें कीं, उदाचा धूर गुरांचे शरीरांत भिनला पाहि-
जे. याजकरितां त्याचें तोंड मात्र खुलें ( मोकळें ) ठेवून
आंगा भोंवती जाड कपड्याचा पडदा लावून व वरूनही आ-
च्छादन घालून त्यांत धुरी करावी.

वरील रोग गुरांस होण्या बरोबर निरफळें, लसूण, मिर्यें,
पिंपळी, सुंठ किंवा आलें, कोष्टकोळिंजन आंबेहळद, शहाजिरें,
दालचिनी, लवंग, जायफळ, या समभाग औषधांची पूड स-
हामासेपासून दोन तोळेपर्यंत गुरांचे शक्तीप्रमाणें घेऊन कों-
बट पाण्यांत थोडा गूळ कालवून त्यांत मिश्र करून पाजा-
वें. हें औषध दुवक्त देत जावें. रोग निस्तोष झाल्यावर बंद
करावें. आणि गव्हांचे रोठांतून तूप खाऊं घालावें. हा उ-
तार आहे.

वायवर्ण्याचा पाला बारिक कुटून पोटल्या बांधाव्या.
आणि तापलेल्या तव्यावर गरम करून सर्व सांध्यास शें-
क द्यावा.

रोगी गुरांस गव्हांची कण्हेरी गूळ घालून कोंबट देत
जावी. व जे पदार्थ वायूचा जोर करणारे नसतील असे
खाऊं घालावे.

रोठ किंवा कोणताही पदार्थ खाऊं घालणें झाल्या-
स त्यांत वर सांगितलेला निरफळादिक औषधांची थो-
डथोडी पूड व मीठ घालून दिल्यानें रोगाचा अगदीं निस्तो-
ष होण्यास हें उत्तम औषध आहे.

## लागांच्या धार्मीचें लक्षण आणि उपचार.

हा रोग स्पर्शजन्य आहे. बहुधा फाल्गुनमासापासून ज्येष्ठमासापर्यंत या रोगाचा उद्भव होतो. अतिशय ऊन लागून गुरांचे आंगांतील रक्त तापून बिघडलें म्हणजे हा रोग उत्पन्न होतो. लाग आला म्हणजे गुरांचे पायांच्या गेळांतून व सभोंवतीं चट्टे पडून त्यांतून स्राव होतो. पाय कुजतात. व त्यांत कृमी होऊन अतिशय दुखतात. त्यामुळें गुरांच्यानें नेटानें उभें रहावत नाहीं. शरीरांतील रक्ताचें पाणी होऊन पायांतून स्रवतें. त्यास दुर्गंधी फार येते. आंग तापतें. दांत साधारण हालूं लागतात. जीभ नरम होते. तोंडांतून लाळ पडते. हा रोग साहजीक दृष्ट्या दिसण्यांत सोपा असा वाटतो परंतु मोठा घातुक असून कित्येक प्रांतांत या रोगानें हजारों गुरें प्राणास मुकलीं आहेत. ज्याठिकाणीं या रोगाचा संचार होतो. तेथें शेंकडों गुरें अजारी पडतात. त्यांची व्यवस्था चांगल्या प्रकारें न ठेविल्यास त्यांतून तीं निभावतां मुष्किल पडतें.

लागलेलें गुरूं चांगले गुरांत बांधूं नये. व त्याचें उच्छिष्ट दुसऱ्या गुरांस खाऊं घालूं नये. या रोगानें जें गुरूं पडतें, त्याच्यानें गवत वगैरे खावावत नाहीं. या करितां त्यांची शक्ति क्षीण न होण्यास्तव गव्हांची, तांदुळांची अथवा अळशीची कण्हेरी करून त्यांत थोडें तूप घालून पाजावी. समशीत प्रकारचें खाणें द्यावें. वारंवार जागा बदलून गुरें बांधावीं. पूर्वी बांधलेली जागा सार-

वून स्वच्छ ठेवावी.

१ लागलेलें गुरूं दिवसा दोनप्रहरीं तापलेल्या रेतीं-तून चालवावें. या योगानें कंडू शमन होऊन आराम वाट-तो. क्षतावर धूळ बसून स्राव कमी होतो.

२ तांबडा जांबा दगड अग्नींत तापवून त्याजवर ताक घालावें म्हणजे त्यांतून वाफ येईल. ती लागलेला पाय उ-चलून धरून त्या गुराच्यानें सहन करवेल अशी द्यावी. नंतर जुन्या इटांची पूड वस्त्रगाळ करून क्षतावर वारंवार बसवावी. हे दोन्ही सामान्य इलाज होत.

३ गुरास लागाचा उपद्रव झाला असें समजण्यांत येतांच पिकलेलीं केळीं दहा आणि खजूर एक शेर हीं दोनही एकत्र मळून खाऊं घालावीं. या योगानें तत्काळ गुण येतो.

४ गुरांस लागाचा उपद्रव होऊं नये याकरितां प्रत्येक गुराचे दोन्ही शिंगांस छिद्रें पाडून त्या छिद्रांत सांबराचे शिंगाची मेख मारावी. म्हणजे लागाचा उपद्रव ती मेख असेपर्यंत कधींही होत नाहीं. हा चमत्कारिक अनुभविक तोटगा आहे.

## क्षतांत कृमि झाले असतां ते मरण्यास उपचार.

काळीमास (माशी) इच्या विष्टेपासून कृमि होता-त. कोणत्याही जागीं क्षत जाहलें असतां तेथें मास (माशी) बसते आणि विष्टा करिते. ती विष्टा वेळोवेळीं

न काढिनां नशीच राहूं दिली असतां त्यापासून कृमी उत्पन्न होऊन क्षतांत प्रवेश करितात. आणि क्षतें विस्तीर्ण करितात. याकरितां मास हगली असतां ती वेळोवेळीं काढून टाकावी. क्षत झालेली जागा बारिक कपड्यानें आच्छादित करावी. तेर अळवाची मुळी किंवा कडव्या करवंदीची मुळी थंड पाण्यांत उगाळून क्षतावर लेप द्यावा. या योगानें जरी मास बसली तरी तिची विष्टा विघरते. त्यापासून कृमि होत नाहींत. वारंवार टरपेन्टाइन (वायुतेल असें म्हणतात तें) क्षतावर घालीत रहावें.

जागाच्या किंवा कोणत्याही प्रकारच्या क्षतांत कृमि (कीड) झाले असतां ते नष्ट होण्यास खालीं लिहिलेलीं औषधं योजावीं.

१ उत्तम तपकीर, विलायती बंदुकीची दारू व कापूर हीं तिन्ही औषधं समभाग घेऊन चूर्ण करावें. आणि क्षतांत भरून पट्टा बांधावा. येणें करून दोन प्रहरांत कृमी मरतात.

२ अघाड्याचा (मणेराचा) चीक क्षतांत भरावा.

३ काजूच्या बिकांवरील सालाचें तेल क्षतावरच घालावें. याणें तात्काळ कृमी मरतात. परंतु चांगल्या आंगास हें लागलें असतां फांफरें पडतात. याजकरितां सावधगिरीनें वापरावें.

४ पांगाऱ्याच्या तुंबऱ्या, हेंदीच्या तुंबऱ्या, काळ्या धोत्र्याचें फळ व तुंबऱ्या आणि भिलमीतील कीड (भाळ)

हीं सर्वत्र औषधें एकत्र वाटून क्षतांत रस पिळावा. व त्याच औषधांची वडी करून क्षतांत मुखावर बसवावी.

## लागलेल्या गुरांचे पाय बरे होण्याकरितां तेल काढावयाचें त्याची रीति.

खरशिंग, सिसवा, सागवान, पांढराचंदन, व शिरस या पांचही झाडांची साडींच सुकीं लांकडें आणून त्याच्या पातळ व बारिक ढलप्या (साल्ें) काढाव्या. त्या एका मातीचे घागरींत भरून त्या घागरीचे तोंडावर बरोबर बसणाऱ्या जोगें कोडयें (पणती.) घेऊन त्याजला चार बारिक छिद्रें मध्यभागीं पाडून तें झांकण घागरीचे तोंडावर बसवून एकेरी फडक्याचा घट्ट दादरा बांधावा. या प्रमाणें तयार करून नंतर जमिनींत एक खाडा (खळगा) खणून त्यांत कांहीं तरी मोठ्या तोंडाचे पातेल्या सारखें भांडें ठेवून त्या भांड्यांत वरील घागरीचें तोंड ठेऊन पालथी (उलथी, उपडी) घालावी. आणि त्या घागरीचे तळावर सारख्या शेणी रचून अग्नी करावा. म्हणजे घागरींतील सालांचें तेल खालील भांड्यांत पडेल. हें तेल नित्य दोन वेळ प्रमाणें लागलेल्या पायांस सर्व क्षतावर सात दिवसपर्यंत लावावें. याणें जखमा लौकर बऱ्या होतात.

६. रसकापूर. अर्ध तोळा घेऊन चार तोळे मोंगली

एरंडाच्या चिकांत मिश्र करावा आणि लोखंडी तव्यावर चांगला खल करावा. आणि प्रतिदिवशीं दोन वेळ प्रमाणें तीन दिवस लावावें. हें औषध लावलेली जागा गुरांस चाटितां येऊं नये, असा बंदोबस्त ठेवावा.

३ पांढरा कांदा जाळून त्याची काळी राख करावी ती चार मासे, पांढरा कात चार मासे, शंखजिरें सहा मासे, हीं औषधें उंडयांचे किंवा मोंगली एरंडयांचे तेलांत खलून लेप द्यावा. व त्याजवर कपिला या नांवची नारंगी सारखी पूड गांध्याचे येथें मिळते ती दाबून बसवावी.

४ दिंडयाचें झाडाच्या कंद (जमिनींत गठ्या सारखी मुळी असते ती) आणून स्वच्छ धुवून बारिक वाटावा. हा वाटते वेळीं फारच बुळबुळीत होईल, तसा झाल्यावर त्याची वडी करून क्षत झालेली जागा पुसून त्याजवर बसवावी. हें औषध एकदा सुकलें म्हणजे क्षत बरें झाल्या वांचून निघत नाहीं. या मुळें मग दुसरा इलाज करितां येणार नाहीं. यास्तव अगदीं शेवटींचे पायरीस हें औषध लावावें.

५. नाडमाडाचा कवळ म्हणजे ज्या ठिकाणीं नवीन सूय उत्पन्न होते, तेथें खोबऱ्या सारिखा पांढरा असतो तो ठेंचून त्याचा अंगरस क्षतावर पिळावा. आणि त्याजवर पांढऱ्या काताची वस्त्रगाळ पूड बसवावी.

लागानें कुजलेले पाय पाण्यानें धुऊं नये. या-

ण्याचा स्पर्शही करूं देऊं नये. हीं क्षतें धुणें झाल्यास खालीं लिहिलेल्या काढ्यानें धुवावीं.

निंबाची साल, बाभळीची साल, किंजळीची साल, कुंभ्याची साल आणि आंवळीची साल ह्या एकत्र बारीक कुटून अष्टमांश काढा करून तो कोंबट असे पर्यंत लागाचे किंवा कोणत्याही जातीचें क्षत धुण्यास योग्य आहे.

## वांसरांस फोड होतात त्याचें लक्षण आणि उपचार.

गाईचे किंवा म्हशीचे वांसरांस फोड होतात. त्या योगानें एखादें वेड लागलेलें मनुष्य जसें धांवतें. उड्या मारतें; त्याप्रमाणें लहान वांसरें उड्या मारितात, धांवतात, क्षणोक्षणीं उठतात व बसतात पाठीचा कणा वारंवार लपवितात वेळोवेळीं ओरडत (हंबरत) राहतात. पाठीचे कण्यास हात लाविला असतां तो अगदीं खालीं वांकवितात. हीं लक्षणें जाहलीं असतां फोड झाले असें समजावें. हे फोड पक्क झाल्यावर इलाज चालत नाहीं. याजकरितां या रोगाचें लक्षण दृष्टोत्पत्तीस येतांच औषधोपचार करावे.

### उपचार.

ज्या वांसरांस फोड झाले असतील त्यांच्या पाठीचे कण्याचर हंरभऱ्या एवढे तीन खडे चार चार अंगुळांचे अंत-

रानें ठेऊन, डाव्या पायांतील वाहाणेनें किंवा जोड्याचे तळानें प्रत्येक खड्यावर तीन तीन प्रहार करावे. नंतर त्या-वांसरास एका कुशीवर (बाजूवर) निजवून तसेंच उलटून दुसऱ्या कुशीवर परतावें. ह्मणजे पाठीचा कणा जमिनीस लाऊन उताणें करून दुसऱ्या कुशीवर उलटावें. ह्या प्रमाणें तीन वेळ उलटपालट करावी.

२ गायतेरड्याचें बीज सहामासे पर्यंत गरम पाण्यांत बारिक वाटून नवटांक पाण्यांत कालवावें. आणि कपड छान करून पाजावें हें औषध तीन दिवस प्रत्यहीं एक वेळ प्रमाणें देऊन, एक एक वेळ वर सांगितल्या प्रमाणें वासरूं वर उलटावें व मळद्वारांत कांदा शिरकवून ठेवावा, तो नित्य चार घटिका ठेऊन नंतर काढून टाकावा.

## बैल किंवा रेडे रक्त मुततात त्याचें कारण आणि उपचार.

अल्पवयांत फार मेहनतीस लागलेले बैल किंवा रेडे पोटीं फुटून अथवा एखादे दरडी वरून अपघातानें पडून आंग ठेंचणें, व पोटांत आंचका बसल्यानें आणि अति उष्णता झाल्यानें सतत किंवा महिन्यांतून कांहीं दिवस रक्त मुततात.

## उपचार.

तुकुमराई तोळे २ व इसबगोल तोळे २ हीं दोन्ही औषधें रात्रीं भिजत घालून प्रातःकाळीं. त्यांतच, आणखी

अच्छेर पर्यंत थंड पाणी घालून कुवळून सरबत करावें. त्यांत जिन्याची पूड अर्ध तोळा व साखर घालून द्यावें. हें औषध उष्णतेपासून विकार झाला असतां नित्य प्रातःकाळीं एक वेळ प्रमाणें पांच दिवस पर्यंत द्यावें.

२ भांग चांगली वाटून घोंटा ( पिण्यास तयार करितात त्याप्रमाणें.) तयार करून गुराचे शक्तीप्रमाणें पाजावी. हें औषध कोणत्याही कारणानें गुरूं रक्त मुततें त्याजवर देण्यास योग्य आहे.

३ तांबड्या माडाचे कोंवळे बोंडे ( नारळ ) सालांसहित ठेंचून सुमारें अच्छेर पर्यंत आपरस काढावा. आणि त्यांत तुरटीची पूड तीन मासे पर्यंत घालून पाजावें. हें औषध शीण भरून गुरें रक्त मुततात त्याजवर देण्यास योग्य आहे.

## गुरांस चामा फोड होतो त्याचें लक्षण आणि उपचार.

चामाफोड ह्या रोगाचे तीन प्रकार आहेत. जो काळजास फोड होतो. त्यास अवधी फार नसतें. दुसरा हिंवांत म्हणजे कण्याचे बाजूस होतो. याजवर पंधरा दिवस पर्यंत इलाज केला तर चालतो. तिसरा भेंडीस म्हणजे शेंपडीकडे होतो. तें गुरूं एक महिनापर्यंत ही वांचतें. एकंदरींत दोन प्रकार साध्य आहेत. व पहिला प्रकार कष्टसाध्य होय. हा रोग गुप्त असल्यामुळें लौकर दृष्टोत्पत्तीस येत नाहीं. कोणत्याही प्रकारचा फोड जाहला असतां गुरूं सुक्या लेंड्या हगतें. परंतु कुंद जाहला असतां जसे दांत हालतात तसे

या रोगानें हालत नाहींत. फार वेळ स्थिरपणानें बसत नाहीं त्याचें मन चंचळ दिसतें. शेंपडी वारंवार मुरडीत रहातें. पाठीचे कण्यावर भोंवरा करीत नाहीं. नित्य प्रातःकाळीं व सायंकाळीं आंगावरील लंव फुलवितें. चारा झपाटयानें खात नाहीं. दिवसें दिवस शक्ति इतकी लौकर क्षीण होते कीं, दहा बारा, दिवसांत अवर्णास येतें. या लक्षणांनीं परीक्षा करावी. वर शीर इलाज न झाल्यास जो एक फोड झालेला असतो, त्याचे सभोंवतीं आणखी फोड उठून मग असाध्य होऊन उपाय चालत नाहीं.

## उपचार.

नांबडया कुंभ्याची अंतरसाल व किंजळाची अंतरसाल या दोन्ही समभाग कुटून ऊन पाणी घालून कच्चा अच्छेरपर्यंत रस काढावा. त्यांत तिनकेंच तिळांचें तेल मिश्र करून प्रातःकाळीं व सायंकाळीं याप्रमाणें सात दिवसपर्यंत द्यावें.

२ गृध्रपक्ष्याचे (गिधाडयाचे) आंडयांच्या कपच्या सुमारें अर्धा तोळा घेऊन बारीक कुटून पूड करावी. ती पूड सुमारें कच्चा अच्छेर ऊन पाण्यांत कालवून प्रतिदिवशीं एक वेळप्रमाणें तीन रोज द्यावें. हें औषध या रोगावर त्वरित गुण करणारें आहे.

३ कोंबडयाचें आंड्यांचीं टरपलें सुमारें एक तोळापर्यंत नवटांक पाण्यांत वाटावीं. आणि त्यांतच आणखी सुमारें पावशेर ऊन पाणी घालून कपडछान करावें. नंतर

सुमारें वाला इतका भिजलेला कळीचा चुना त्यांत कालवून द्यावें. हें औषध गुण येईपर्यंत सात दिवस नित्य एक वेळ प्रमाणें देत जावें.

४ भिलाव्याचे झाडाच्या सालीचा रस ७ तोळे काढून त्यांत १४ तोळे नारळाचा रस घालून दोन वेळ द्यावें.

शेण पातळ होणें, पाठीचे कण्यावर भोंवरा करणें, फार वेळ स्वस्थपणानें बसून रवंथ करणें इत्यादि लक्षणांनीं फोड झालेल्या गुरांस उतार पडत चालला असें समजून औषध देणें तें कमी कमी देत जावें.

## लाळ्या रोगाचें लक्षण आणि उपचार.

लाळ्या रोग यासच तोंडाचा लाग असें म्हणतात. हा रोग स्पर्शजन्य आहे. रक्तविकारापासून याचा मूळ उद्भव होतो. मनुष्यास मुखरोग झाल्यामुळें (तोंड आल्यामुळें.) जशा हिरडी सुजतात, त्याप्रमाणें या रोगानें गुरांच्या हिरडी सुजतात. टाळ्यांनील घांटा (लोळा) आंवळा गिळवत नाहीं इतका, दुखतो. कानांचीं अग्रें थंड होतात. गवत किंवा कोणताही पदार्थ खाववत नाहीं. व रवंथही करवत नाहीं. तोंडांतून सतत चिकट लाळ गळत राहते. ही लाळ इतकी पडते कीं, एक दिवसांत सुमारें दहा शेरपासून अदमण पर्यंत वाहते. ती दुसऱ्या गुराचे चाटण्यांत येऊं नये. व या रोगानें ग्रस्त झालेल्या गुरांचें उच्छिष्ट दुसऱ्या गुराचे खाण्यांत येऊं नये, याविषयीं फार सावधगिरी ठेवावी. समशीत खाणें आणि औषधोपचार योजावे.

## उपचार.

टेंबुरणीच्या अथवा खैराच्या सालीचा काढा करून भुयफोड म्हणजे पर्जन्यकाळीं जमिनींत मातीचे फोड उत्पन्न होतात. त्याची माती सुमारें एक तोळा मिश्रकरून वस्त्रगाळ करावा. या काढ्यांत वेखंड, वडागरी मीठ, ज्येष्टमध, वाळा, नागकेशर, व कबाबचिनी या समभाग औषधांची पूड सुमारें एक तोळापर्यंत घालून प्रतिदिवशीं एक वेळ प्रमाणें तीन दिवस द्यावें.

२ कबाबचिनी, तुरटीची लाही, वेलची दाणे, ज्येष्टमध व हळद या समभाग औषधांची पूड करून दिवसांतून तीनवेळ तोंडांत चोळावी. या योगानें लाळेंतील चिकटपणा मोडून येईल, सुजलेल्या हिरडी बसून जाऊन तीन दिवसांत चांगला गुण येईल.

लाळ्या रोग झालेल्या गुरांस नांदुळांचे कण्हेरींत थोडें तूप घालून देत जावी. पातळ व थंडाई देणारे पदार्थ खाऊं घालावे. तेणें करून त्यांची पोटभरणा चांगली होईल व शक्तिक्षीण न होईल अशी तजवीज ठेवावी. या रोगांतून गुरूं चारपांच. दिवसांत बरें झाल्यावर पेंड वगैरे कठिण पदार्थ कांहीं दिवस भिजवून खाऊं घालावें.

## गुरांस हरीक लागल्यास त्यांचीं लक्षणें व उपचार.

लागते हरीक (कोद्रु) गुरांचे खाण्यांत आले किंवा त्यांचीं पळंजें अगर सालें (केंडें) खाण्यांत आल्यास

त्या योगानें माज चढतो. हाच शक्तीबाहेर होऊन वक्तशीर इलाज न झाल्यास चार प्रहरांत गुरूं मरतें. हरीक लागण्याचीं लक्षणें हीं आहेत कीं, गुरूं थर थर कांपतें. चालतां चालतां वांकडें तिकडें झोंक जाऊन पडतें. उभें राहूं सकवत नाहीं. लंब फुलिवतें. कान पाडतें. व पोट फुगतें. कांहीं वेळानंतर शेणांतून हरकांचीं सालें पडलेलीं आढळतात. हा विकार तीन दिवस राहतो. परंतु दोन रोज तर याचा अम्मल फारच असतो.

## उपचार.

१ मोंगली एरंडाच्या पानाचा पाणी घालून काढलेला रस शक्तीप्रमाणें दीडशेरपर्यंत दिल्हा असतां एक प्रहरांत माज उतरतो. जरूरच दिसल्यास एक वेळ औषध दिल्या उपरांत चार घटकांनीं पुन्हाही द्यावें.

२ कोंहोळ्याचें पाणी दीड शेर पर्यंत काढून त्यांत एक शेर पर्यंत गूळ कालवून पाजावें.

३ पेरविणीचे पाल्याचा रस अच्छेर व केळीचे सोपांचा रस अच्छेर हे एकत्र करून कालवून हें मिश्रण द्यावें.

## गुरांस थंडी जाहली असतां त्याचें लक्षण आणि उपचार.

सर्व गुरांस केव्हां केव्हां थंडीचा आजार होतो, परंतु जेव्हां तो त्याचे शरीरांत पूर्ण व्याप्त होतो, तेव्हां समजण्यांत येतो. याचें लक्षण असें आहे कीं, एकाएकीं गुरूं अंगावरील लंब फुलवितें. कान थंड होतात. आणि

पोट फुगतें. कांहीं वेळ इलाज न केल्यास पोटाची फुगटी जास्त चढत जाते. आणि कुंथ घालूं लागतें. ही स्थिति झाल्यावर त्याच्यानें उभें व्हावत नाहीं. व मान उचलून धरवत नाहीं. वक्तशीर उपचार झाल्यास लौकरच गुण येतो. परंतु उपचार न झाल्यास हाच रोग असाध्य होतो.

## उपचार.

निरफळें एक तोळा, ओंवा दोन तोळे, लसूण एक तोळा, लवंग अर्धतोळा, मिऱ्यें अर्ध तोळा, मोहरी तीन मासे (पावतोळा.) जायपत्री अर्ध तोळा, जायफळ एक तोळा, हिंग पावतोळा, आंबेहळद दोन तोळे, हीं सर्व औषधें. बारीक वाटून समान तीन भाग करावे. एक एक तासाचें अंतरानें एक भाग अच्छेर ऊन पाण्यांत कालवून पाजावें. परंतु रोगाचा जोर जास्त असल्यास प्रथमच एकदम दोन भाग एक शेर पाण्यांत कालवून द्यावें.

गाई व बैल यांस वर लिहिल्याप्रमाणें वजनानें औषधं घ्यावीं. परंतु म्हशी किंवा रेडे यांस देणें झाल्यास हींच औषधं दुप्पट वजन घ्यावीं. आणि शक्तीप्रमाणें वारंवार चार किंवा पांच वेळ द्यावें.

२ उत्तमदारू (मद्य.) गुरांचे शक्तीप्रमाणें रोगाचा जोर असेल तशी एकशेरपर्यंत पाजावी.

३ रुखचांफा यांची साल एक भाग, काळ्या कुडई

ची किंवा नागलकुड्याची साल अर्धभाग व शेवग्याची साल दोन भाग ह्या तिन्ही सालीचा ऊन पाणी घालून अच्छेरपर्यंत रस काढून त्यांत ओंवा, लसूण, मिऱ्यें व हळद या समभाग औषधांची पूड दोन तोळेपर्यंत मिश्र करून द्यावा.

ह्या रोगीगुरांस मलमूत्र साफ होऊन पोटाची फुगवटी निःशेष काढून गवत खाऊं लागल्यावर व रवंथ करूं लागल्या उपरांत दोन प्रहरानंतर कोमट पाणी द्यावें. तोंपर्यंत पाणी अगदीं पाजूं नये. व ओला चाराही घालूं नये. फक्त भात्येण गवत मात्र घालावें.

## झेंडू ह्या रोगाचें लक्षण आणि उपचार.

गुरांचे नरडीखालीं, आंतील बाजूस चेंडूसारख्या आकाराचा कांट्यांनीं व्याप्त असा एक गोळा होतो. त्या योगानें गुरूं वारंवार हिंसतें. दिवसेंदिवस शुष्क होतें. त्याच्यानें कठिण पदार्थ खाववत नाहीं. हा रोग सहा महिनेपर्यंत विशेष जोर करीत नाहीं. म्हणजे त्या गुराच्यानें तो सहन करवतो. आणि साधारण निर्वाहापुरतें खातां येतें. परंतु जेव्हां रोग पक्क होतो तेव्हां त्याजवरील कांटे तीक्ष्ण होतात. यामुळें खानपानादिक व्यवहार बंद होतो. ही स्थिति झाल्यावर हा रोग असाध्य झाला असें मानावें. तोंपर्यंत पाहिजे तेव्हां उपचार केल्यानें गुण येतो, हें जरी खरें आहे, तत्रापि रोगाचें बीज शरीरांत वाढूं देणें हें अपायकारक आहे. याजकरितां रोगाचा प्रादुर्भाव

दिसूं लागतांच औषधांची योजना करावी.

## उपचार.

१ कांटलीण म्हणजे करटोली किंवा फागलीण असें जीस म्हणतात. त्या वेलीचा कंद बारिक कुटून त्यांत पाणी घालून अच्छेरपर्यंत रस काढावा. आणि त्यांत सुमारें आठ गुंजापर्यंत अक्कलकऱ्याची पूड घालून पाजावा. हें औषध प्रत्यहीं एक वेळ प्रमाणें सात रोज द्यावें. आणि आठवे दिवशीं मुगाचे वाफण्यांतून अथवा गव्हांचे रोटांतून अच्छेरपर्यंत तूप खाऊं घालावें. हें तूप घालणें हा वरील औषधाचा उतार आहे. याकरितां तें अवश्य दिलेंच पाहिजे.

२ दिपमाळ म्हणजे झेंडू हीं झाडें बहुतेक प्रांतीं प्रसिद्ध आहेत. एका सरळ दांड्यास जागजागीं गोलाकृती चेंडू येतात ते तीक्ष्ण कुसांनीं व्याप्त असतात. हे सुकलेले झेंडू आणून वस्त्रगाळ पूड करावी. नंतर ती पूड प्रतिवेळीं एक तोळाप्रमाणें कांहीं वेळ थंडपाण्यांत भिजत घालून पुन्हा वाटावी. आणि एक शेर पाण्यांत भांगेच्या घोटद्याप्रमाणें कालवून कपडछान करून पाजावें. याप्रमाणें तीन किंवा पांच दिवस प्रत्यहीं दोन वेळ हें औषध दिलें असतां रोग निर्दोष होतो.

## शेळीपेई या रोगाचें लक्षण आणि उपचार.

शेळीपेई या रोगासच शेळारोग किंवा डावीपेय फुगली असें म्हणण्याचा प्रचार आहे. शिळें अन्न व पेंढीहून प्राणी

इत्यादि थंडपदार्थांचे सेवनानें अजीर्ण होऊन पोटांत थंडीनें (वायूनें) गुबारा धरतो. आणि डाव्या कुशीवरून कण्यापासून तीन अंगुळें खालीं व तीन बरगड्या सोडून चौथ्या बरगडीचा मध्यभाग (सांधा) यांत आलेलें आंतडें म्ह० पेच ती फुगते. पोट फुगतें. अन्न किंवा तृणादिकांवर इच्छा अगदीं कमी होते. जडत्व येतें. हा रोग जाहलेलें गुरूं अगदीं शून्य झाल्या सारिखें होतें. सर्वांगांत वायूचा जोर होतो. म्हशी व रेडे यांस तर हा रोग त्वरित व्याप्त होतो. याचें कारण त्यांची थंड प्रकृति असल्यानें रोगाचा अंमल विशेष बसतो. रोग झाल्या वेळेपासून निदान सोळा प्रहरांचे आंत उपचार झाला तर हटकून गुण येतो. त्यानंतर रोग कष्टसाध्य होतो. परंतु प्रखर इलाज केल्यानें लागू पडतात. शेवटचे वेळेस गुरूं श्वासोश्वास सोडितेवेळीं कुंथ धारूं लागतें. औषध पाजिलें असतां तें पोटांत न जातां नाकांतून बाहेर येतें. ही स्थिती झाल्यावर इलाज करणें व्यर्थ होय. याकरितां औषध देण्यास विलंब न करितां त्वरित योजना करावी.

हा रोग सौम्य असे पर्यंत सौम्य औषधें किंवा सौम्य डाग दिल्यानेंही गुण येतो. व थंडी झाली असतां जीं लक्षणें होतात, तींच लक्षणें या रोगानेंही होतात. वेळीं या रोगावर देण्याचीं जीं औषधें खालीं लिहिलीं आहेत. तीं मिळविण्यास विलंब लागेल, असें अस-

त्यास थंडीचा विकारशमन होण्याकरितां जीं औषधें सांगितलीं आहेत, तीं प्रथमदर्शनीं यारोगावर द्यावीं. येणें करून कांहीं वेळ रोगाचा जोर जास्त होणार नाहीं.

## उपचार.

१ काजूची दारू, गुरांची शक्ति व रोगाचा जोर असेल, त्यामानानें अच्छेर पासून एक शेरपर्यंत पाजावी.

२ जगदळ्याची साल, खुरचांफ्याची साल, वावळ्याची साल आणि ठेवण्याची साल ह्या चारही सालीं सुमारें दोन तोळेपासून तीन तोळेपर्यंत समभाग एकत्र कुटाव्या आणि ऊन पाणी घालून कच्चा एक शेर रस काढावा. त्यांत तिरफळें, लसूण, मिरें, पिंपळी, ओंवा, सुंठ, जायफळ, लवंग, आंबेहळद, कोष्टकोळिंजन ह्या समान औषधांची पूड चार तोळे पर्यंत मिश्र करून प्रतिदिवशीं दोन वेळ प्रमाणें तीन दिवस द्यावें. परंतु रोगाचा जोर जास्त असल्यास प्रथम दिवशीं दोन दोन तासांचे अवकाशें पोटाची फुगवटी कमी होऊन उतार पडेपर्यंत (गुण वाटूं लागेपर्यंत.) तीन वेळा किंवा चार वेळाही द्यावें.

३ वरील रोगावर डाग देण्याचा प्रकार असा आहे कीं, डाव्या बाजूचे पुढील पायांच्या फऱ्याचे आंत पाठीच्या कण्यापासून तीन अंगुळें खालील बाजूस तीन बरगडया सोडून मध्य भागाचे खाच्यांत दाभणाचे किंवा लोखंडी बारीक गजाचें टोंक तप्त करून,

त्याणें छिद्र पाडावें. ह्मणजे निदान अडीच अंगुळेंपर्यंत तें टोंक उभें टोंचून शरीरांत गेल्यानें फुगलेल्या आंतड्यास चटका बसतो. याप्रमाणें कृती झाल्यानंतर, जर रोग शेवटचे यत्नेस कष्टसाध्य झालेला असेल, तर तिळांचें तेल, जोरखंडाचें पळींत चांगलें तप्त करून पुनेलानें बारिक धारेनें त्या छिद्रांत पंधरा थेंबपर्यंत घालावें. येणें करून रोग त्वरित आकर्षण होतो. हा इलाज अगदीं शेवटचा आहे.

ज्या वेळीं रोगी गुरांचा रोग पहिल्या यत्नेस साध्य असेल अशा वेळीं हीं औषधें लागू न पडल्यास डाग द्यावे. परंतु ते डाग वर सांगितलेल्या जागीं एक एक अंगुळाचे अंतरानें उभ्या रेषा तीन व त्यावरच आडव्या रेषा तीन असे डाग द्यावे. अथवा बुटाच्या ढाग्याचे गोलाकृति एकाजवळ एक असे पांच सहा डाग द्यावे. हे डाग पक्के असावे.

रोगी गुरांस जरी डाग दिले तरी औषधेंही देत रहावें. व औषधें देत असतां डागही द्यावे. एकंदरीनें गुण वाटूं लागेपर्यंत सर्व उपचार सुरू ठेविल्यानें रोगाचा जोर त्वरित कमी पडतो.

हा रोग झालेलें गुरूं आपल्या स्वेच्छेनें खाईल तर फक्त भातयेण गवत मात्र घालावें. परंतु जडपदार्थ, अथवा पाणी किंवा अन्न तीन दिवसपर्यंत अगदीं देऊं नये. नंतर रोगाचा जोर कमी झाल्यावर सूक्ष्म हलके असे प-

दार्थ खाऊं घालावें. व दोन तीन दिवस कोंमट पाण्यांत थोडा गूळ कालवून तें पाणी प्रथम दिवशीं दोन शेर, दुसरे दिवशीं चार शेर व तिसरे दिवशीं पिईल तितकें, या क्रमानें देऊन त्यानंतर पूर्ववत प्रमाणें थंड पाणी पाजूं लागावें. परंतु हा नियम रोग चांगला बरा झाल्या उपरांतचा आहे.

शिळें किंवा आंबून खराब झालेलें अन्न गुरांस अगदीं देऊं नये. तसेंच नित्यचा गवता नसतां एकच दिवस अन्न जास्त घालूं नये. त्यापासून अजीर्ण विकार होऊन रोगोद्भव होतो.

## धांवरें या रोगाचें लक्षण आणि उपचार.

. जसें मनुष्यांस धांवरें किंवा मोतें रक्त ह्या नावाचे रोग होतात, तसेंच गुरांसही होतात. हे रोग मनुष्यांस एकदम व्याप्त होऊन निकृष्ट दशेस आणीत नाहींत. परंतु गुरांस फार त्वरित म्हणजे दोन प्रहरांत व्यापितात. गुरांस झालेल्या रोगास धांवरें किंवा रक्तावा असें म्हणण्याचा प्रचार आहे. ह्या रोगाचे आरंभींचें लक्षण हें आहे कीं, सर्व शरीरांतील रक्त थिजल्या सारखें होऊन रोग होण्यापूर्वीं कांहीं दिवस तें गुरूं पुष्ट झाल्या सारखें दिसण्यांत दिसतें. परंतु ती सुजेची छाया आलेली असते. ज्या वेळीं रोग प्रबळ होतो तेव्हां एकाएकीं त्या गुरांस पुष्कळ ताप येतो. तेव्हां कानाचीं व शिंगांचीं मुळें तप्त होतात. व लंब फुलतें अशी स्थिति असतां दो-

न तीन कलाकांचे आंत गळ्याखालील सांखळ, गालफडें, नाकपुड्यांचा प्रदेश व ओंठ इतकीं स्थानें एकदम सुजतात. हीच सूज नरडीपासून काळजापर्यंत जाऊन पोंचतांच काळीज फुगून गुरूं मरतें. ह्या रोगास सूज दिसूं लागल्यावर त्वरितच उपचार करण्यांत आले तर कदाचित लागू पडतात. वक्तशीर उपचार झालेलीं गुरें शेंकडा पंचवीस मरतात. व काळिजापर्यंत सूज पोंचल्यावर उपचार झालेलीं गुरें शंभरांतून वीसपर्यंत बचावतात. हा रोग दिसण्यांत हलका; परंतु अल्प अवधींत प्राणहानी करणारा दुष्ट आहे. ह्या रोगग्रस्त गुरांचे आंगांतील रक्त- अतिशयित उष्ण किंवा पर्जन्य व विषारी पदार्थांनीं युक्त असलेलें तृण तसें संचित उदकांतील इत्यादि भक्षणांत आल्यानें अथवा विषारी झाडांचा पाला खाण्यांत आल्यानें दूषित होऊन वाहक शक्तीचा अवरोध होतो. आणि वर सांगितल्या प्रमाणें परिणाम घडतो. या साठींच प्रथम या ग्रंथांत गुरांना तृण कसें असावें वगैरे जे नियम सांगितले आहेत ते अवश्य ध्यानांत ठेऊन त्यांची शरीरसंपत्ति जेणें करून निरोगी आणि हुशार राहील, अशा तजविजी योजाव्या.

## उपचार.

एक बाजूच्या शिंगापासून नरडीचे खालून दुसऱ्या शिंगापर्यंत सुजलेल्या जागीं व दोन्ही गालफडांवर डाग द्यावे. हे डाग उभे म्हणजे रेषा ओढून द्यावे. आणि

नरडीच्यां खालीं सांखळीच्या दोहों बाजूंस दोन दोन अंगुळें अंतरानें वर्तुळाकृति बुराचे डाग द्यावे. या रोगास मुख्यत्वें करून डाग देणें हाच प्राधान्य उपचार होय. जसा रोगाचा जोर असेल तसे डागही सौम्य किंवा पक्के असावे.

२ सागवानाचे पानांचा, पाणी घालून पांचशेरपर्यंत रस काढावा. त्यांत मोर्नागेळीचें गेळफळ उगाळावें आणि नाचण्यांचें पीठ व भुंग्यशिसें ह्मणजे जमिनींत मातीचा काळा दगडा सारखा गड्डा असतो, तें मिश्र करून शिजवावें. आणि ढाट रावडी झाल्यावर सुजलेल्या सर्व भागास वारंवार लेप देत रहावें.

३ नारळाचा अंगरस एक शेर काढून त्यांत काळ्या देवीची मुळी सव्वा मासे पर्यंत उगाळावी. आणि तुरटीची पूड एक तोळा व हळदीची पूड तीन तोळेपर्यंत घालून हें मिश्रण वारंवार पाजीत रहावें.

४ हाच रोग लहान वांसरांस झाला असतां डागसहन करण्याची शक्ति त्यांचे अंगीं नसते. याजकरितां मागें सांगितल्या प्रमाणें वांसरांस चांफ्याच्या काड्यांचे चोर द्यावे.

धांवरें हा रोग झालेल्या गुरांच्या तोंडांतून लाळ किंवा पाणी पडतें. त्याचा अथवा रोगी गुराचे मूत्राचा स्पर्श निरोगी गुरांस होऊं देऊं नये. कारण हा रोग स्पर्शजन्य आहे. ह्याकरितां रोगी गुरांस स्वतंत्र (पृथक्)

बांधावीं. या रोगांतून गुरूं बरें झाल्यावर आठ दिवसां नंतर त्याचे कोठ्यांतील मलशुद्धी होण्याकरितां या पुस्तकांत शेवटीं जीं रेचक औषधं सांगितलीं आहेत त्यां पैकीं कोणतेंही सूक्ष्म रेचक द्यावें. त्या योगानें दोन किंवा तीन रेच झाल्यावर उतारांचें औषध द्यावें. कारण रोगामुळें तें शक्तिहीन झालेलें असतें. याजकरितां जास्त रेच होऊं देऊं नये व पुन्हा जरूरच वाटेल तर चार दिवसानंतर आणखी एक वेळ रेचक द्यावें.

## मुसळा या रोगाचें लक्षण व उपचार.

मुसळा यासच मुसळवादा म्हणतात. गुरांची पटकी, गुरांचा वारवा, हगवणीचा आजार व गुरांची साथ इत्यादि म्हणण्याचा प्रचार आहे. जशी मनुष्यांस पटकी तसाच हा रोग गुरांस घातक आहे. नासलेलें पाणी किंवा विषारी तृण ह्याचे सेवनानें अथवा शरीरांतील रक्त भरवर उन्हानें तप्त होऊन बिघडल्यानें व अजीर्ण दोषानें या रोगाचा मूळ उद्भव होतो. आणि हा स्पर्शजन्य रोग असल्यामुळें संसर्गानें लागलाच दुसऱ्या गुरांसही होतो. यास्तव प्रथम सांगितल्या प्रमाणें रोग झालेल्या गुरांस स्वतंत्र बांधण्याची वगैरे सर्व व्यवस्था ठेवावी.

ह्या रोगाचे मुळारंभींचें लक्षण हें आहे कीं, रोगोद्भव होण्यापूर्वीं सुमारें दोनप्रहरपर्यंत गुरूं म्लान होतें. व वारंवार पोटांत खळखळतें, त्यावेळीं त्याच्यानें नित्य क्रमाप्रमाणें झपाट्यानें उठवत नाहीं. राहून राहून एकाएकीं

आंग काढिनें ( दचकनें ) याचें कारण कांहीं कांहीं वेळानें त्याचे पोटांत असह्य निडीक येते. साधारण ताप येतो. आणि तोंडाचे मुस्कुटीवरील ओलसरपणा शुष्क हो-तो. रवंथ करीत नाहीं. हीं लक्षणें प्रथम यतेचीं आहे-त. नंतर मळद्वारानें केवळ पाण्यासारखें दुर्गंधीयुक्त शे-णाट काळसर रंगट अशा पाण्याचे रेच होऊं लागतात. व त्यांतून बारिक बारिक पोटांतील आंतड्यांचे तुकडे ( मांसखंडें ) झळंबदा सारखे पडूं लागतात. हें सूक्ष्मदृष्टी-नें एक काडी घेऊन रेच झालेलें शेण ( मळ ) शोधन के-ल्यानें आढळतात. मूत्र कमी होतें व केव्हां केव्हां मुळींच होत नाहीं. हीं लक्षणें दुसऱ्या यतेचीं आहेत. या दोन यतेंत गुरें असे पर्यंत औषधोपचार लागू होतो. परंतु तिसऱ्या यतेस त्या गुराचें शरीरांतील सर्व रक्ताचें पा-णी होऊन मळद्वारानें पडूं लागतें. शेवटीं क्वचित रक्त सुद्धां पडतें. डोळ्यांतील बाबल्या ( कवड्या ) शिथिल हो-त येतात. मान सांवरून धरण्याची शक्ति नष्ट होते. श-रीरावर गोंचड्या किंवा पिस्वा असल्यास त्या उतरूं ला-गतात. व काळ्या मोठ्या माशा झडून बसूं लागतात. ही स्थिति झाल्यावर कोठा रिक्त झालेला असतो. यामु-ळें वातसंचार होऊन आंतडीं फुगतात. आणि त्यांतच त्या चा अंत होतो. हा रोग सर्व रोगांपेक्षां मोठा घातक अल्प अवधींत प्राणहानि करणारा, स्पर्शजन्य, हवेनें फैलावणा-रा म्हणजे रोगी गुरांचे आंगावरून गेलेली हवा कुठऱ्या

गुरांस लागली असतां त्यांसही होणारा व अकस्मात उद्भवणारा असा आहे. या दुर्धर रोगावर खात्रीचीं अनुभव पाहिलेलीं औषधें खालीं लिहिलीं आहेत. हीं औषधें रोगाची मध्यमावस्था म्हणजे दुसरी यत्ना असे पर्यंत एकामागून एक अशीं दोन तीन अथवा वारंवार एक जरी देत राहिलें तरी हटकून गुण देणारीं आहेत. शेंकडा ७५ पर्यंत गुरें बचावतात.

गुरें बाळगणारे सर्व लोकांस याच ठिकाणीं असें सुचविणें भाग आहे कीं, आपल्या आसपासचे गावांत किंवां किंवा आसपासचे गोठ्यांत ह्या रोगाचा आजार झाला असेल तेव्हां त्या गुरांशीं आपल्या गुरांचा संबंध ठेऊं नये. इत्यादि सूचना पूर्वीं दिल्याच आहेत. परंतु ही महत्वाची सूचना आहे कीं, प्रत्येक रात्रींतून तीन वेळां चांगला उजेड घेऊन गोठ्यांत जावें. आणि प्रत्येक गुरांची स्थिति, शेण कोणत्या प्रकारचें आहे. रवंथ करितात किंवा नाहीं. ह्या गोष्टी अवश्य पहाव्या. कारण अशीं कांहीं उदाहरणें घडून आलेलीं आहेत कीं सायंकाळीं गुरांची व्यवस्था करून धनी घरीं येऊन स्वस्थ राहतात. इकडे चारप्रहर रात्रींत एखाद्या गुरास रोग होतो. आणि पांच सात रेच होऊन सूर्योदयापूर्वींच बांधलेल्या जागीं रोगी गुराचा अंत होतो. याकरितां याविषयीं गाफल न राहतां सावधगिरी ठेऊन वक्तशीर इलाज करावा.

## उपचार.

१ चेलाची साल एक शेर व फळ आंबाड्याची साल अच्छेर; या दोन्ही एकत्र कुटून उन पाणी घालून एक शेर रस काढावा. त्यांत अच्छेर पर्यंत नाक किंवा दहीं व सुंठ, मिरें, पिंपळी या समान औषधांची पूड तीन तोळे पर्यंत घालून फार त्वरित पाजावा. हें औषध मळाचें आकर्षण करणारें आहे.

२ काळ्या आंब्याची साल व काळ्या फणसाची साल ह्या दोन्ही समभाग बारिक कुटून पाणी घालून दीड शेर पर्यंत रस काढावा. आणि त्यांत ओवा, सुंठ, लसूण, मिऱ्यें, व तिरफळें या समान औषधांची पूड तीन तोळे पर्यंत मिश्र करून औषध पाजण्याची सिद्धता झाल्यावर तें गुरांचे तोंडांत ओतते वेळीं त्यांत कळीच्या चुन्यावरील निवळी अथवा थोडा चुना पाण्यांत कालवून तें पाणी घालून तात्काळ पाजावें.

३ नारळी माडाची कोंवळी पोय, माडी काढण्या योग्य असते ती मुळांतून तोडून काढावी. आणि तोडलेलें तोंड दोरीनें मजबूद बांधून त्या पोईचे सभोंवती केळीच्या ओल्या पानाचें वेष्टण करून फोपाट्यांत बाफून काढावी. नंतर ती साधारण थंड होत आल्यावर वेष्टण काढून टाकून जोरानें पिळून रस काढावा. आणि त्यांत जायफळ, मायफळ, लवंग, दालचिनी, सुंठ, मिऱ्यें, पिंपळी, हळद, कोष्टकोळिंजन व तिरफळें या सर्व समभाग औषधांची

पूड दोन तोळे पर्यंत घालून पाजावा. दोन दोन कलाकांचे अवकाशें हें औषध प्रत्येक वेळीं एकेक पोईचा रस ह्या प्रमाणें चारवेळ दिल्हें असतां हरकून गुण येतो. पहिले दिवशींच गुण वाटला तरी दुसऱ्या व तिसऱ्या दिवशीं ही एक एक वेळ हेंच औषध द्यावें. परंतु दुसरे दिवशीं ही जर रोगाचा कांहीं प्रादुर्भाव अवशेष आहे असें वाटेल तर दोनवेळही द्यावें. दुसऱ्या यत्नेंन गुरू असे पर्यंत हें औषध पोंचलें तर जायां होत नाहीं.

४ मुख्यत्वें करून काळ्या उसांचा अथवा न मिळेल तर कोणत्याही जातीचे उसांचा रस बाटल्यांत भरून मजबूद बूच लावून त्या बाटल्या जमिनींत तीन महिनेपर्यंत पुरून ठेवाव्या. नंतर काढून संग्रहास ठेवाव्या. अशा प्रकारें तयार झालेला रस गुराचे शक्तीप्रमाणें एक शेरपर्यंत घेऊन त्यांत मेथ्यांचें पीठ चार तोळे, जायफळ, मायफळ, लवंग, मिऱ्यें, हळद व तिरफळें, ह्या समान औषधांची पूड दोन तोळेपर्यंत घालून पाजावा. हें औषध दोन दोन तासाचें अवकाशें तीन वेळ पर्यंत द्यावें. व दुसऱ्या आणि तिसऱ्या दिवशीं फक्त एक वेळ द्यावें. तें प्रथम दिवशीचे परिमिताहून निमें असावें.

५ चेराची साल, रूग्रणीची साल, काडयाकुडईची साल, वडाच्या पारंब्याचीं अग्रें व नारळी माडाचीं पाळें, हीं सर्व समभाग औषधें एकत्र कुटून ऊन पाणी घालून एक शेरपर्यंत रस काढावा. त्यांत तितकाच नारळाचा अंगरस

मिश्र करून जायफळ एक, मायफळें चार, लवंगादोन, शहाजिरें तीन व आलें पांच या भागानें हीं सर्वत्र औषधें एकत्र कुटून त्या रसांत कालवून वस्त्रगाळ करावा. आणि प्रतिवेळीं अच्छेर प्रमाणें हें मिश्रण जेव्हां रेच होईल तेव्हां पाजावें. या प्रमाणें चार रेच होईपर्यंत चार वेळ द्यावें. नंतर पुन्हा इतकेंच तयार करून निरवाळस गूण येईपर्यंत रेच होईल तेव्हां पाजीत रहावें. जस जसा मल आकर्षण होऊन गूण वाटूं लागेल तसतसें औषधही कमी देत जावें.

वर सांगितलेलीं औषधें सतत जवळ बाळगितां येणारीं नसल्यानें प्रसंगीं दुर्मीळ होतील याजकरितां सतत संग्रहास ठेविण्यायोग्य अनुभाविक औषध खालीं लिहिलें आहे. ह्या औषधानें या रोगाचीं शेंकडा ऐंशीपर्यंत गुरें बरीं होतात. व प्रसंगीं सर्व रोगांवरही याचा अंमल बसतो. यास्तव हें औषध सर्वत्रांनीं अवश्य संग्रहास ठेऊन उपयोग करावा. मेहनत करून एकवेळ तयार केलें असतां बारामहिनेपर्यंत उपयोगीं पडतें. मात्र कागदांत पुडी बांधून ठेऊं नये. बाटलींत भरून मजबूद बूच लाऊन ठेवावें. आणि महिन्यांतून दोन वेळ ती बाटली उन्हांत ठेवावी.

## औषधांची वजनवार याद.

| | |
|---|---|
| मायफळें तोळे दहा | तिरफळें तोळे सहा |
| जायफळें तोळे तीन | तुरटी. तोळे दोन |
| लवंग तोळे चार | कडूइंद्रावनाचें फळ अर्धतोळा. |

काजऱ्याची बी नग एक
विकमा अर्ध तोळा
ओंवा तोळे सहा
कोष्ट कोळिंजन तोळे सहा.
सुपारीचें फूल तोळे सहा
केंशर तोळा एक
सुंठ तोळे बारा
पिंपळी तोळे तीन
इंद्रजव तोळे पांच
अतिवीष तोळा अर्धा
पिंवळेंकोष्ट ( मलबारीहळदतोळे
जायपत्री तोळे दोन
शहाजिरें तोळे चार
बाद्यान तोळे तीन
आंबेहळद तोळे दहा
चिंचेची साल तोळे दोन
मुरडशेंग तोळे दोन
रसवंती तोळे दोन
अजमोदा तोळे पांच.
वावडिंग तोळा एक
पानाची जड तोळेचार
पळसपापडी तोळा अर्धा
नागकेंशर तोळे दोन

मिऱ्यें तोळे आठ
वेखंड तोळे चार
कडू जिरें तोळे चार
सागरगोट्याचे गर तोळे २
भांगेची पानें धुतलेली तो०२
डिकेमाली तोळे तीन.
तुकुमराई तोळे तीन
कुटकी तोळे चार
नागरमोथा तोळे सहा
भारंगमूळ तोळे चार
पाडावळीचीं पाळें तोळे चार
लसूण तोळे आठ.
बडीशोप तोळे दहा.
खसखस तोळे सहा.
पाषाणभेद तोळे दोन
तेजबळ तोळा एक.
शतावरी तोळे दोन
बाळबेलफळ तोळे दहा.
टकमकीच्या काचऱ्यातोळे२०
बाळलिंबाची अंतर्साल तो०५
शेंगव्याची साल तोळे दोन
वडाचे पारंब्याचीं अग्रेंतो०२
इसबगोल तोळे ५

| | |
|---|---|
| किशइन तोळे पांच | डाळींबाची साल तोळे पांच |
| आंवळकाठी तोळे चार | कचोरा तोळे तीन |
| उपरसाळीचीं पाळें तोळे ३ | माटंगनारीचा अथवा लिं-बिणीचा स्कका पाला तोळे चार. |
| एरंडमूळ तोळे पांच | |
| घोंटयाची फळें तोळे चार | |
| ग्वारीक तोळे तीन | बोळ तोळे तीन |
| पलाशोक तोळा अर्धा. | ब्राह्मीचा सुकलेला पाला तोळे पांच |
| काळीमुसळी तोळे तीन. | |
| बाळआंबे तोळे सहा | नरवेलाचा पाला तो॰ पांच |
| अंबरतोळा अर्धा. | सुरबंदसुकलेली तोळे पांच. |

वर लिहिलेलीं सर्व अथवा त्यांपेकीं मिळतील तित-कीं औषधें वर सांगितलेल्या वजनाप्रमाणें घेऊन एकत्र कुटून बारिक भूड करून ठेवावी. रोग झालेल्या गुराचे शक्तीप्रमाणें पहिल्या खेपेस एक तोळ्यापासून पांच तोळे पर्यंत भूड, अच्छेर ऊन पाण्यांत नवटांक गूळ कालवून त्यांत मिश्र करून पाजावी. मध्यें दोन तास अवकाश गेल्यावर पुन्हा. पूर्वोक्त क्रमानेंच हें औषध द्यावें परंतु जसा जसा रोगाचा जोर कमी होत येईल, तसतशी औषधाची भूड थोड थोडी कमी देत जावी. ह्याप्रमाणें पहिल्या दिवशीं चार वेळपर्यंत औषध द्यावें. व दुसऱ्या दिवशीं रोगाचा अवशेष आहे असें दिसल्यास दोन वेळ द्यावें. व गूण आला असला तरी दुसरे दिवशीं [illegible]ति-

सरे दिवशीं फक्त प्रातःकाळीं एक वेळ तितक्याच पाण्यांत एक तोळापर्यंत पूड कालवून द्यावी.

हें औषध तयार केल्यावर बारा महिन्या उपरांत उपयोगांत आणणें झाल्यास वर सांगितलेल्या प्रमाणाचे दुपटीनें दिल्हे पाहिजे. कारण तितका त्यांतील सत्वांश कमी होतो.

हेंच औषध शेळा रोग व थंडीपासून झालेले सर्व विकार आणि साधारण प्रकारचे सर्व रोगांवर याच अनुपानांतून (गुळाच्या पाण्यांतून) दिल्हें असतां उत्तम गुणदायक आहे.

-मुसळा रोग झालेल्या गुरांस रोग निरवाल्यास बराहांईपर्यंत पाणी पाजूं नये. व कोणताही जड किंवा थंड पदार्थ खाण्यास घालूं नये. फक्त भात्येणा गवत मात्र घालावें. ज्यावेळीं तें गुरूं गवत खाऊं लागेल आणि रवंथ करूं लागेल त्यानंतर चार प्रहर अवकाश गेल्यावर त्याची स्थिति चांगल्या आरोग्यतेची दिसल्यावर ऊन पाण्यांत थोडा गूळ कालवून तें पाणी कोंबट झाल्यावर थोडें थोडें द्यावें. प्रथमच एकदम पोटभर पाणी देऊं नये. वेळोवेळीं थोडें थोडें जास्त देत जावें. याचें कारण एकदांच पाणी जास्त दिल्ह्यानें पोटांतील मोकळीं झालेलीं आंतडीं तात्काळ फुगतील. याकरितां याविषयीं फार सावधगिरी ठेवणें अवश्य आहे.

—ह्या रोगास तीन दिवस होईपर्यंत कण्हेरी ही देऊं

नये. नंतर गव्हांची कण्हेरी करून त्यांत गूळ व तूप घालू-न द्यावी. या योगानें रोगी गुरांचीं आंतडीं नरम होऊन टक-टवी येते. तांदुळाची कण्हेरी अगदीं देऊं नये. कारण त्यापा-सून पोटांत थंडीचा गुबारा धरतो.

वर सांगितलेलीं सर्व औषधें गुणकारकच आहेत; परंतु एखाद्या गुरास एक औषध दिलें असून तें लागू न पड-लें तर लागलेंच यापैकीं कोणतें ही दुसरें औषध देण्याची त्वरा करावी. अथवा प्रथम एक, दुसऱ्यानें दुसरें व तिस-ऱ्या खेपेस तिसरें अशीं दिलीं तरी हरकत नाहीं. कार-ण हीं सर्व औषधें एका रोगावरचींच असून परस्परांस बाधक नसून रोगशामकच आहेत.

ह्या रोगावर सर्वांगा भोंवती छत्तिसा डाग ही देण्याचा प्रचार आहे. परंतु डाग दिल्हा तरी औषध दिलेंच पाहिजे.

## जाळिंद्र रोगाचें लक्षण आणि उपचार.

जाळिंद्र हा रोग गाई म्हशी इत्यादि सर्व मोठ्या व ल-हान गुरांस ही होतो. हा रोग फार तात्कालिक आहे. ह्या-चा आरंभ झाल्यावेळेपासून बारा प्रहरांत गुरूं मरतें. ह्या रोगांतून शेंकडा तीस पर्यंत गुरें वक्तशीर इलाज झाल्यास वांचतात. रोग गुप्त असल्यानें तो होतांच समजण्यांत येत नाहीं. आणि जेव्हां समजतो तेव्हां तो पूर्ण व्याप्त होतो. यामुळें औषधाचा अंमल बसण्यास अवकाश मिळत नाहीं. अगदीं खराब झालेलें व थोडें (संचित) असून उन्हानें ता-पलेलें पाणी पिण्यांत आल्यानें त्यांतील विषारी पदार्थ का-

ळजास झोंबतो. व तेणेंकरून काळिजावर तांबडे पिंवळे, काळे, व पांढरे रंगाचे मोठमोठे डाग पडतात. व अग्नीनें भाजल्याप्रमाणें दाह होऊन त्यांत छिद्रें उत्पन्न होतात. मूत्र बंद होतें. मळ क्वचित् होतो. रोगाच्या पूर्णव्याप्तीचे वेळीं ते चट्टे टाळ्यांतून जिभेवर आलेले दिसतात. आणि दोन्ही नाकपुड्यांत जो तांबुसरंगाचा भाग असतो. त्याजवरही आढळतात. हा रोग ज्या जनावरास होतो त्याची आरंभींच कंबर मोडते. मागील पाय जमिनीवर टेंकववत नाहींत. कंप सुटतो. थंड पाणी पिण्यास फार लंपट होतें. श्वासोच्छ्वास फार गरम येतात. पोट फुगतें. रवंथ करणें व भोंवरा करणें ह्या दोन्ही गोष्टी बंद होतात. वारंवार डोळ्यांतून पाणी येतें. हा रोग जरी घातुक आहे, तरी सांथीनें येऊन सतत होणारा नव्हे. क्वचित होतो यासच जळकी अथवा काळीज जाळी असेंही म्हणण्याचा प्रचार आहे.

## उपचार.

१ नवईचे कांद्याचा अथवा केळीच्या कांद्याचा रस काढून त्यांत थोडें तूप घालून द्यावा. या योगानें चट्टे नरम पडतात. आणि मूत्रद्वार मोकळें होऊन रोगाचा जोर कमी होतो. हें औषध एकदांच जास्त न देतां प्रतिवेळीं कच्चा अच्छेरपर्यंत, याप्रमाणें तीनचार वेळही देणें योग वाटल्यास द्यावें.

२ जळरूख या नांवाचे रक्ष आव्याचे किंवा धावड्याचे झाडा सारखे असतात. याचे सालीचा रंग बाहेरून पांढरा व आंतून तांबडा असतो. व साल एक इंचपर्यंत जाड असते.

आणि पानें कांहींशीं नाडुकीचे पाना सारखीं असतात. या झाडाची साल ठेंचून पाणी घालून एक शेरपर्यंत रस काढा-वा आणि त्यांत नारळाचा अंगरस तितकाच मिश्र करून ति-ळांचे तेल पावशेरपर्यंत घालून पाजावा. नंतर दोन तासांचे अवकाशें पुनः हेंच मिश्रण वर सांगितलेल्या प्रमाणें तयार करून दोन वेळ दोन भाग करून द्यावें.

३ भांगेचा धोंटा पावशेर व सबज्याचे पाल्याचा रस पावशेर एकत्र करून त्यांत चार तोळेपर्यंत तूप घालून पाजावा. हें औषध तीनवेळ दोन दोन तासांचे अवकाशें दिल्हें पाहिजे.

यांपैकीं मिळतील तितकीं औषधें एका मागून एक द्यावीं. ह्या रोगास डाग देऊन गुण येत नाहीं. उलट फार त्रास मात्र होतो. यास्तव हा रोग झालेल्या गुरांस डाग देऊं नये.

## गुरांस देवी येतात त्यांचें लक्षण आणि उपचार.

जशा मनुष्यास देवी येतात, तशाच जनावरांसही येता-त. देवी येण्यापूर्वीं एक दोन दिवस थरथर ताप येतो. मागें कित्ता एक ठिकाणीं गुरांस ताप आल्याचीं जीं चिन्हें सांगित-लीं आहेत त्याप्रमाणेंच सर्व लक्षणें होतात. नंतर तिसऱ्या दि-वसापासून पोटाखालीं व्यक्त जागीं बारीक बारिक पुटक-ळ्या दिसूं लागतात. गाईचे आंचळावर व ओंटीस या पु-टकळ्या विशेष येतात. देवी आलेल्या गाई दूध पिवूं देत नाहींत. याचें कारण आंचळ फार दुखतात. परंतु हें दूध

संचित राहूं देऊं नये. कारण त्यामुळें ओटींत दूध नासतें. ओंटी तडतडीत होते. आंचळांस व ओंटीस कात्रे पडतात. याकरितां होईतोंपर्यंत वांसरांस न पाजतां फक्त ओंटींतील दूध तजविजीनें पिळून टाकावें. हें दूध मुलांनीं अथवा मनुष्यांनीं खाऊं नये. कारण देवी ह्या स्पर्शजन्य आणि सांथीने येणाऱ्या आहेत. तसें दूधही नष्ट होऊन बिघडलेलें असतें. तें अगदीं उपयोगांत आणूं नये. देवी आलेल्या गाईचे वांसरांस निरोगी गुराचें दूध पाजावें. रोगी गुराचें दूध काढणारानें आंचळ व ओंटी स्वच्छ धुऊन दुसऱ्या गुराचें दूध काढावें. या दुधाचा स्पर्श दुसऱ्या गुराचे ओंटीस होऊं देऊं नये. देवी आलेल्या गुरांची जतन चवदा दिवसपर्यंत चांगली करावी. उन्हांत चरण्यास सोडूं नये. नाचण्यांची कण्हेरी करून त्यांत तूप घालून द्यावी. थंड उपचार आणि थंड समधान खाणें द्यावें. देवींस, हिंदुस्थानींत माता. गुजराथेंत काकाबळया इत्यादि म्हणतात. देवी आंगावर उठल्या असतां त्या गुरांस थंड समधान खाणें, पिणें इत्यादि साधारण उपचार केल्यानें अन्य औषधांवांचूनच गुण येतो.

## देवी पोटांत पडतात त्याचें लक्षण आणि उपचार.

देवी येण्यापूर्वीं ताप वगैरे येऊन जीं चिन्हें व्हावयाचीं तीं आरंभींच होतात. परंतु देवीचे फोड आंगावर न येतां पोटांत उमटतात. (उत्पन्न होतात) तेव्हां श्वासोच्छ्वासाबरोबर दुर्गंधी येते. त्याला पेटमेकी माता अथवा देवी पोटीं पडल्या असेंही म्हणण्याचा प्रचार आहे. देवी पोटांत पडलेलें

गुरूं ताप आल्यापासून अकरा दिवसांत मरतें. यावर क्वचित्च इलाज लागू पडतो. याकरितांच देवीचा ताप येऊन नसा प्रादुर्भाव दिसल्यास देवी पोटांत न पडतां बाहेर निघून येण्याकरितां योजण्याचे उपायः-

रोगड्याचे झाडावरील बांदें, फोपाट्यांत भाजून पावशेरपर्यंत अंगरस काढावा. आणि त्यांत अळंबीं हीं पर्जन्य काळीं उत्पन्न होतात तेव्हां सुरवडून ठेवावीं. याचे कळे सुमारें दोन तोळेपर्यंत बारीक वाटून दोन दिवस प्रातःकाळीं हें औषध द्यावें. येणें करून देवी पोटांत न पडतां बाहेर येतात. परंतु हें औषध ताप येतांच दिल्हें पाहिजे. नंतर देऊन उपयोग होत नाहीं.

२ देवी बाहेर येण्याकरितां औषध दिल्यावर त्या आंगावर दिसूं लागेपर्यंत खाणें, पिणें उष्ण असावें व वातुळपदार्थ तितके खाऊं घालावे. आणि त्या आंगावर दिसूं लागल्यानंतर शीत उपचार करावे.

देवी आंगावर आलेलें गुरूं सहसा दगावत नाहीं. व पोटांत आल्या असतां तें सहसा निभावत नाहीं.

## मूत्रावरोधाचें लक्षण आणि उपचार.

अतिशय उष्णतेमुळें, किंवा कोणत्याही कारणानें धपका (धक्का) बसल्यानें गुराचें मूत्र बंद होतें. हा आजार झाला असतां एक दिवसपर्यंत तें गुरूं अंगजोरानें विकृतीस सहन करून खानपानादिक व्यवहार चालवितें (करितें) परंतु सुमारें पांचप्रहरांनंतर पोटास फूग चढत जाते. वारं-

थार निथण (कुंथून मूत्र होण्याचा यत्न) करितें. परंतु मूत्र अगदीं होत नाहीं. या लक्षणांनीं रोगपरीक्षा होतांच औषधाची योजना त्वरित करावी.

## उपचार.

जगदळ्याच्या शेंगेंतील बिया दोन व सागवानाच्या बिया तीन घेऊन पळसाच्या फुलांचा एक शेरपर्यंत काढा करून त्यांत उगाळाव्या. आणि थोडें सोरमीठ घालून पाजावें हें औषध दोन दोन कलाकांचे अवकाशें मूत्र होईपर्यंत दोन तीन वेळही द्यावें.

२ केळीचे सोपांचें पाणी एक शेरपर्यंत काढून त्यांत सोनकाव एक तोळापर्यंत उगाळावी. आणि थोडें सोर मीठ व मिरपूड पांचगुंजापर्यंत घालून पाजावें.

३ सरांट्यांचा (गोखरूंचा) काढा एक शेर करावा. आणि त्यांत थोरल्या पाडावळीची मुळी एक तोळा व चांद्या कोत्याचीं फळें पांचपर्यंत उगाळून पाजावा. हीं दोन्हीं औषधें प्रथमप्रमाणेंच तीनवेळपर्यंत द्यावीं.

## गुरांस कोणत्याही प्रकारचा रोग झाला असतां त्याची परीक्षा होऊन उपचार करीपर्यंत प्रथम देण्याचें औषध.

जगदळ्याची साल सुमारें दोन तोळे व टकमकीचीं फळें ज्यास कोठिंमडीं किंवा काचऱ्या ह्मणतात. हीं सुकलेलीं सुमारें पावशेर वजन घेऊन त्यांत लसूण सहा मासे, मोहरी तीन मासे, मिऱ्यें सहामासे, हळद एक तोळा,

हीं औषधें मिश्रकरून बारीक वाटावीं. नंतर सुमारें दीड शेरपर्यंत ताक घेऊन त्यांत कालवून पाजावें. या औषधानें सामान्य रोग बरे होतात. व कोणत्याही रोगाचा कांहीं वेळपर्यंत जास्त उठाव होत नाहीं. परंतु हें औषध विषारावर किंवा जे रोग अल्प अवधींत व्यास होणारे अतिशय उष्णतेमुळें झालेले असतील त्यांजवर मात्र देऊं नये.

## गुरांस कीड लागली असतां त्याचें लक्षण आणि उपचार.

पर्जन्यकाळीं अथवा अन्य दिवसांत ओल्या चाऱ्यावर रानांतील किडी असतात त्यांत एक पोंगी या नांवाची विषारी कीड असते, ती चाऱ्याबरोबर गुरांचे खाण्यांत आली असतां जसा मुसळा रोग होऊन रेच होतात त्याप्रमाणें रेच होऊं लागतात. परंतु तितकी दुर्गंधी नसते. व या रेचाबरोबर आंतड्याचे वगैरे तुस येत नाहींत. कीड लागलेलें गुरूं क्वचित् तोंडांतून ही फेंस काढितें. परंतु भोंवरा करतें. इत्यादि लक्षणांनीं परीक्षा करावी.

### उपचार.

सुपाऱ्या शिजविल्यावर त्याचें जें पाणी रहातें, तें आटवून गट्ठ करून ठेवितात. ह्यास सुपारीचें फूल असें म्हणतात. हें औषध गांध्याचे दुकानीं मिळतें. तें सुमारें पांच तोळेपर्यंत आणून वस्त्रगाळ पूड करावी. ती पूड वऱ्यांचें एक शेर पीठ घेऊन त्यांत मिश्र करावी. आणि पाणी घालून चांगलें मर्दन करून (मळून) चार लाडू करून एक एक

घटकेच्या अवकाशें एक एक ह्याप्रमाणें दिल्यानें त्वरित गूण येतो.

२ पालोरें नांवाचीं झाडें गोड्या नद्यांचे किनाऱ्यावर असतात. ह्या झाडांचीं ओलीं पानें व सुग्रिणीची साल हीं दोन्हीं एकत्र कुटून एक शेरपर्यंत रस काढावा. त्या रसांत मायफळांची पूड तीन तोळेपर्यंत मिश्र करून प्रतिवेळीं अच्छेरपर्यंत याप्रमाणें तीनवेळ किंवा जरूर वाटल्यास चार वेळही द्यावें.

## रक्तविकारानें गुरांचे आंगावर गांठी उठतात त्याचें लक्षण आणि उपचार.

गुरांचे शरीरांतील रक्त बिघडल्यानें त्यांच्या आंगावर जागजागीं उठाणूं (मोठ्या गांठी) उठतात. हा विकार सर्व गुरांस होतो. परंतु म्हशी वरेडे यांस फार होतो. या गांठी बसविण्याचा इलाज न केला तर कांहीं दिवसांनीं त्या फुटून पू वाहूं लागतो. व त्याजवर मास बसली म्हणजे तात्काळ कृमी होऊन तीच क्षतें भयंकर होतात. त्या योगानें गुरें शक्तिक्षीण होतात. आणि व्रण ही असाध्य होतो.

## उपचार.

गोड्या पाण्याचे ओढे किंवा नद्या यांचे कांठावर अथवा जेथें अगदीं कमी पाणी असून फातळ असतें तेथें पाण्यांत झाड शेवाळी ह्या नांवाचीं झाडें उत्पन्न होतात. ज्यास वेरवंडाच्या किंवा कांद्याच्या पात्या लांबट ये-

तात. नशा ह्या झाडांस मृदु पाल्या येतात. या झाडाची ओ-ली मुळी आणून ऊन पाण्यांत उगाळून गांठीवर लेप करा-वा. ह्या प्रमाणें चार दिवस नित्य लाविल्यानें गांठीवरील त्वचा भाजल्या प्रमाणें होऊन गांठ विरघळते. मात्र औ-षध उगाळून लावणारानें त्याचा स्पर्श आपल्या डोळ्यांस किंवा शरीरास होऊं देऊं नये. औषध लावतांच हात स्वच्छ धुवावे.

## गुरूं फांकलें असतां त्याचे आंगांत व्य-था कोणत्या जागीं आहे त्याची परीक्षा आणि उपचार.

गुरूं दरडीवरून पडल्यामुळें किंवा झूज (लढाई) होत असतां फांकलें तर लंगडूं लागतें. किंवा कंबर दु-खावते. अथवा कोणताही शरीराचा भाग दुखूं लागतो. शिरा गुंततात. अशा गुरांस त्यांची दुखी (व्यथित जागा) पाहण्याकरितां रानशेणींची राख स्वच्छ पांढरी करून पाण्यांत कालवून लेप द्यावा. ज्यावेळीं व्यथा तीक्ष्ण अ-सून दुखत असलेली जागा फार संतप्त झालेली असते. तेव्हां चांगल्या जाग्यावरील लेप सुकण्यापूर्वीं दुखऱ्या तप्त झालेल्या जाग्यावरील लेप आधीं सुकतो. व तेंच दुखणें आंगवणीस पडल्यावर लेप लाविला असतां स-भोंवतीचा लौकर सुकतो. आणि दुखऱ्या जागीं ओल-सर राहतो. ह्याप्रमाणें परीक्षा करून जी जागा दुखरी (फां कलेली) असेल तेथें खुणा लावून ठेवावी.

## उपचार.

जी दुरवरी जागा असेल तेथें बोटानें दाबून पहावें. म्हणजे वेगानें उडणारी शीर जेथपर्यंत चमकत असते तेथ पर्यंत सरळ रेषेनें अथवा बुटाच्या टाणीचे कच्चे डाग द्यावे. रेषांचे डाग देणें झाल्यास उभ्या तीन व आडव्या तीन रेषांचे डाग द्यावे.

२ गुरूं फांकलें; परंतु दुरवी विशेष नसून साधारण लचक मात्र भरलेली आहे. असें असेल तेव्हां घायपातीच्या (रेडे अनसीच्या) कांद्याचा रस काढून त्यांत भुंयशिसें व नाचण्याचें पीठ घालून शिजवून चांगली आंबील (राबडी) तयार करावी. आणि ती साधारण गरम असेपर्यंत दुरवऱ्या जागीं दाट लेप द्यावा. याप्रमाणें प्रथमचा लेप कायम ठेऊन त्यावर दुसरे दिवशीं दुसरा आणि तिसरे दिवशीं तिसरा याक्रमानें चारपांच लेप दिल्यानें गुण येतो.

## गुरांस वर्ण झाला असतां त्याचें लक्षण आणि उपचार.

गुरांच्या आंगांतील रक्त बिघडल्यानें त्यांचे आंगावर प्रथम कांहीं गांठी उठतात. नंतर कांहीं दिवसांनीं त्यांतील एखादी गांठ फुटून दाभणाएवढें रंध्र होतें. त्या रंध्रांतून पांढरट पू वाहूं लागतो. त्यास प्रथमतः विशेष दुर्गंधी नसते, परंतु कांहीं दिवसांनीं फार दुर्गंधी येते. व दिवसेंदिवस पू फार वाहूं लागतो ह्या लक्षणांनीं वर्ण झाला असें जाणावें.

## उपचार.

१ मिरवेलीचें मूळ, वायवर्ण्याचा पाला व झाड पित्त-पापड्याचा पाला हीं तिन्ही ओलीं औषधें समभाग घेऊन पाणी घालून कच्चा एकशेरपर्यंत रस काढून पाजावा. हें औषध सात दिवस द्यावें.

२ भुंयकोंहळ्याचे कांद्याचा रस एक शेर काढून त्यांत हळद व मिर्च्यें या समान औषधांची पूड एक तोळा घालून पाजावी. हें औषध प्रतिदिवशीं एक वेळ प्रमाणें चवदा दिवस द्यावें.

३ पुनईच्या झाडांच्या पाळांवरील ओली साल व खोरेतीची साल ह्या दोन्ही समभाग घेऊन पावशेर रस काढावा. त्यांत तितकाच नारळाचा अंगरस मिश्र करून पाजावा. हें औषध प्रतिदिवशीं दोन वेळ प्रमाणें सात दिवस द्यावें.

## गुराचें शिंग मोडल्यास उपचार.

लढाईंत किंवा झाडास अडकून अथवा कीड लागून गुराचें शिंग मोडलें असतां त्यांत एक बाळशिंग ह्मणजे कळी किंवा मोघ असें ज्यास म्हणतात, तो असतो. त्यांतून अतिशय रक्त वाहूं लागतें. तेणें करून गुरास फार त्रास व दुरवापत होते. याजकरितां जेव्हां असा प्रसंग असेल तेव्हां निवडुंगाचा चीक सुमारें एक शेरपर्यंत आणून त्यांत चार तोळेपर्यंत शेंदूर घालून सारखें मिश्रण करावें. आणि त्या मोघावर लावावें. नंतर एक

जाड फडकें घेऊन त्याजवर हेंच मिश्रण सुमारें तीन कागदांइतकें जाड सारखें चोपडून मिश्रण लावलेली बाजू मोडलेल्या शिंगा सभोंवती वेष्टन करून (गुंडाळून) त्याजवर आणखी एक साध्या फडक्याचें वेष्टन देऊन सुतळीच्या बंदांनीं घट्ट बांधावें. ह्या उपचारानें रक्त वाहण्याचें तत्काळ बंद होऊन मोडलेल्या शिंगांतील मोघ जो कोमल मृदु असतो, त्याचे आंगीं कठिणता उत्पन्न होऊन भरून येतो. हा लेप लावून सहा दिवस झाल्यानंतर बंद सोडून टाकावे. नंतर आंतील दुःख चांगलें बरें झाल्यावर लपेटा आपणच निघून पडेल. तो बलात्कारानें काढूं नये.

## गाई किंवा म्हशी ह्यांचें आंग येतें त्याचें लक्षण व उपचार.

आंग येण्याची संवय लागण्यास मुख्य कारण अशक्तता हें होय. दुसरा प्रकार असा आहे कीं, कितीएक लोक गाभण्या गुरांस पाणी पाजितात त्यांत थोडी पेंड घालित असतात. पेंडीचा स्वाद असल्यानें त्या स्वादानें गुरें यत्नेहून जास्त पाणी पितात. त्या योगानें आंग येण्याची संवय जडते. असेंही कित्येकांचें मत आहे. एकंदरीत आंग येण्याचीसवय लागणें हें फार वाईट आहे. कारण रानांत किंवा कोणत्याही ठिकाणीं जवळ मनुष्य नसतां आंग आल्यास अपघात होतात. याकरितां ज्या गुरास ही खोड असेल त्याजला चालेल तों पर्यंत नजरेपुढें ठेवावें. आणि गाभणेपणीं जतन करण्याची हयगय न करितां पूर्वीं जे नियम सांगितलेंआहेत

ह्याप्रमाणें खानपानादिक चांगली व्यवस्था ठेवावी. व जेणें करून त्याची शक्ती वाढेल अशी योजना करीत रहावें. अंग येणें ह्मणजे जननेंद्रियांतून कोठ्यांतील आंतडीं बाहेर पडणें. यासच भांडें आलें अथवा बेंड बाहेर निघालें इत्यादि देशपरत्वें म्हणण्याचा प्रचार आहे.

## उपचार.

१ कांसाळूची देंटी म्हणजे पानाचा खालीं जो दांडा असतो तो फोपाळ्यांत भाजून (वाफ देऊन) आंग आलें असेल, त्याजवर त्याचा रस पिळावा. आणि लागलीच सोरमिठाची पूड त्याजवर टाकावी. इतक्या अवकाशांत एका कुशल मनुष्यानें लाजाळूचीं पानें बारिक वाटून त्याचा लेप आपल्या दोन्ही हातांस लावून त्या हातानें बाहेर आलेलें आंग आंत लोटावें. याप्रमाणें तें आंग आंत जातांच बसलेलें गुरूं असल्यास उभें करावें. आणि आंबाड्यांच्या दोरांची अथवा फडक्याची निवण्या सारखी गुंडळी करून जननेंद्रियावर (मूत्रद्वारावर) सारखी बसवून बांधावी. म्हणजे मूत्रद्वार मधल्या पोंकळींत घेतलें पाहिजे. कीं जेणें करून मूत्र मार्ग मोकळा राहावा ह्याप्रमाणें दोन दिवस बांधून ठेवून त्या गुरांस चाले तोंपर्यंत बसूं देऊं नये. दोन दिवस गेल्यावर तें आंग आपल्या स्वस्थानीं स्थिर होतें. मग गुरूं बसलें तरी चिंता नाहीं व निवणेंही ठेवण्याचें कारण नाहीं.

२ कांहीं धनगर लोक अथवा सुज्ञ सुइणी औषधावांचूनही कुशलतेनें आंग जागच्या जागीं कायम बसवितात.

या साठीं याविषयीं शोध करून पुरा माहितगार मनुष्य असेल त्याजकडून बसविण्याचा ही प्रयत्न करावा.

३ म्हशी किंवा गाई यांचें कोणत्या ही वेळीं आंग आलें असतां तें नजविजीनें आंत सारून ओसाडी ( सहदेवी ) या झाडाचा पाला हातावर चुरून वीस थेंब पर्यंत रस जननेंद्रियाचर पिळावा. आणि त्या गुरास दोन प्रहर पर्यंत बसूं देऊं नये. म्हणजे आंग येण्याचें बंद होतें.

## बहुमूत्र या रोगाचें लक्षण आणि उपचार.

जसा मनुष्यांस मूत्र सागर होतो. त्याप्रमाणेंच क्वचित् गुरांस ही होतो त्यांत विशेषें करून गाई व म्हशी यांस जास्त होतो. आणि जीं गुरें पेंडीच्या लालचीनें यत्नेहून अधिक पाणी पितात. त्या योगानें बहुधा या रोगाचा मूळ उद्भव होतो. या साठींच पाण्यांत पेंड घालूं नये. निरोगी गुरें पांचसात वेळां मुततात. परंतु हा रोग झाल्यावर प्रत्येक प्रहरांत पांचसात वेळ रोगी गुरूं मुततें. आणि तें प्रतिवेळीं सुमारें कच्चे पांच शेर पर्यंत मुततें. हा रोग झाल्यानें एकंदर शरीरांतील रक्ताचें पाणी होऊन मूत्रद्वारें निघून जातें. त्यायोगानें शक्तिक्षीण होऊन आंतडीं फुगून गुरें मरतात. हा रोग स्पर्शजन्य अथवा सार्थीनें येणारा नसून प्रकृतिमानानें हजार पांचशें गुरांत एखाद्यासच होतो. परंतु उपचार न झाल्यास घातकच आहे. रोगोद्भव झाल्यावेळेपासून दोन प्रहरांत उपचार झाल्यास गुण येतो. औषधी उपचार किंवा खाणें, पिणें थंड नसतां उष्ण असावीं.

## उपचार

१ रोगी गुरांस चाऱ्या ऐवजीं कळंकीचा ओला पाला खाईल तितका घालावा. व कळकीच्या सुकलेल्या पाल्याचा अष्टमांश काढा सुमारें दहाशेरपर्यंत करून त्यांत निरफळें, लवंग, दालचिनी, सुंठ, हळद, जायफळ, कोष्टकोळिंजन ह्या ान औषधांची पूड दहा तोळे पर्यंत मिश्र करून कालवून हीं कांहीं वेळानें एक एक शेरप्रमाणें पाजावा.

२ मुसळा ह्या रोगावर जी बाजारी औषधांची यादी सांगितली आहे. त्या यादींतील औषधांची पूड प्रतिवेळीं तीन तोळेपर्यंत अच्छेर ऊन पाण्यांत कालवून थोडा गूळ घालून तें पाणी पाजावें. हें औषध दोन दोन तासांचे अवकाशें चार वेळपर्यंत गुण वाटे तों देत रहावें..

३ मोहोरी सहामासे, हिंग सहामासे, निरफळें एक तोळा याप्रमाणें तिन्ही औषधें बारीक वाटून ऊन पाण्यांत कालवावीं. आणि कपडछान करून तें पाणी सुमारें अच्छेर पाजावें. हें औषध प्रथम एक वेळ द्यावें. नंतर देणें झाल्यास दुसरें कोणतें ही औषध द्यावें. हेंच पुनः देऊं नये.

## मुरडी किंवा धनकी ह्या रोगाचें लक्षण आणि उपचार.

जसा मनुष्यांस धनुर्वात होतो, त्या भावनेनेंच गुरांस वरील नांवाचा रोग होतो. हा रोग वायूनें होणारा असून स्पर्शजन्य किंवा सांथीनें होत नसून प्रकृतिमानानें आगंतुक क्वचित होतो. रोग होण्याच्या पूर्वीं जनावरांचे स्थि-

तींत कांहींच फरक झालेला दिसत नाहीं. परंतु एकाएकीं उभें असलेलें गुरूं पडतें. त्याची मान आकर्षण झाल्यासारखी होऊन पाठीकडे कुशीवर परतते. मानेंत व सर्व शरीरांत ताठपणा येतो. डोळ्यांच्या पापण्या वारंवार फार जलद उघडतात व मिटतात. तोंडाचे दोन्ही ओंठ विषम होतात. क्वचित् दांतकडीही बसते. त्यावेळीं जनावरास कोणत्याही प्रकारची शुद्ध रहात नाहीं. हा आजार झाल्यापासून चार घटकेच्या आंत उपचार झालाच पाहिजे. जास्त वेळ गेल्यास रोग, कष्टसाध्य होतो.

## उपचार.

१ रिंग्याचा फेंस काढून दोन्ही डोळ्यांत अंजन करावें. गुण आल्यानंतर तीन दिवस नित्य डोळ्यांत लोणी घालीत जावें, हा उतार आहे. लोणी न घातल्यास डोळे रक्ताप्रमाणें तांबडे रहातील.

२ मिरच्या, मोहऱ्या, लसूण, आलें, निरफळें, हिंग हीं सर्व औषधें एकत्र वाटून ऊन पाण्यांत कालवून पाजावीं.

३ रोगोद्भव होतांच प्रथमारंभीं मस्तकावर पक्का डाग द्यावा. व सुमारें दोन तास पर्यंत फक्त अग्नीचा शेक देत रहावें. तितक्यानें गुण न वाटल्यास सर्वांगास भोंवती एक रेषेचा छत्तिसा डाग द्यावा. हा डाग देण्याचा प्रकार मागें सांगितलेला आहे तेथें पहा.

## गुरांचे पायांस फाळ किंवा खुंटी लागल्यास.

१ नांगरास बांधण्याच्या (जुंपण्याच्या) बैलाचे पायांस

नांगराचा फाळ (जगलेची टोंक) लागल्यास अथवा कोणत्याही गुराचे पायास खुंटी लागून पाय चिरला असतां तेरें अळूं (पर्जन्यकाळीं जें पांढरे रंगाचें अळूं उत्पन्न होतें तें) ह्याची मुळी गवतांत गुंडाळून तीन दिवस खावयास द्यावी. याणें जखम पुळणास न येतां व मास बसली तरी कृमि न होतां त्वरित बरी होते. मात्र त्या बैलास जखम बरी होईपर्यंत नांगरास किंवा कोणत्याही कामास लावूं नये.

## बैलास शीण झाल्यास.

एखादा बैल शक्तीपेक्षां जास्त काम पडल्यानें पोटीं फुटतो. आणि काळजांत रक्ताची जळू धरते. त्यासच शीण धरला असेंही म्हणतात. शीण झालेला बैल सतत आंगावरील लंव फुलवितो. त्याचें खाणें, पिणें मंद होतें. दिवसें दिवस शक्तिक्षीण होत जाते. कामास लाविला असतां बसूं लागतो इत्यादि लक्षणें होतात.

## उपचार.

ज्या नारळी माडास तांबड्या रंगाच्या सालाचे नारळ येत असतील, त्या माडावरील अगदी कोंवळे बोंडे (सालांसहित नारळ) काढून ठेंचावे. आणि रस काढावा. त्यांत थोडी मिरपूड घालून प्रत्यहीं एकवेळ प्रमाणें सात रोज द्यावा.

२ नारळाचा अंगरस एक शेर, तुरटीची पूड एक तोळा, मिरपूड सहा मासे व हळदीची पूड एक तोळा मिश्र करून

पाजावा.

३ डुकराची वस्न (चरबी) अच्छेर, नारळाचा रस अच्छेर दोन्ही एकत्र करून त्यांत तुरटी, हळद व मिऱ्यें यांची पूड एक तोळा पर्यंत घालून प्रत्यहीं सायंकाळीं एक वेळ प्रमाणें तीन किंवा पांच दिवस पाजावी.

४ शक्तीप्रमाणें चांगली दारू (मद्य) पाजावी.

## किंव्येण किंवा कोणत्याही जातीचें क्षत होण्याचें कारण आणि उपचार.

गुरांचे शरीरांतील रक्त नासल्यामुळें किंवा मोठा गोंचीड डसल्यामुळें त्या जागीं साधारण आंब्या एवढी गांठ उठते. नंतर ती फुटून सुमारें दोन दाभणा एवढें रंध्र होतें. आणि त्यांतून रक्त वाहूं लागतें. हें प्रथमचें लक्षण होय. नंतर त्याजवर मास बसली असतां कृमी होतात. आणि तें क्षत फार दुःखदायक होतें. यांस किंव्येण किंवा कीड उमळली असें म्हणण्याचा प्रचार आहे. व इतर सर्व क्षतांचीं पुढील लक्षणें हीं आहेत.

### उपचार.

१ क्षतांत कृमि न होण्या करितां तेरें अळवाची मुळी तीन दिवस प्रत्यहीं, एक वेळ प्रमाणें खाऊं घालावी.

२ क्षतावर कडव्या करवंदीचें पाळ उगाळून लेप देत रहावें या योगानें मास बसली तरी कृमी न होतां वितळून जातें.

### क्षतांतील कृमि मरण्यास.

१ कृमि झाले, असतां क्षतांत अष्टाचा (मणेराचा)

चीक भरावा.

२ उन्नमनपकील, कापूर, विलायती काडतुसाची दारू. हे तिन्ही जिन्नस समभाग एकत्र करून बारीक वाटून तें मिश्रण क्षतांत भरावें. आणि पट्टा बांधावा. हा पट्टा चार प्रहरानंतर सोडिला असतां क्षतांतील सर्व कृमि मरतात, आणि पट्ट्यावर येतात.

३ वायूर्चतेल (टरपेन्टाइन) हें वारंवार क्षतावर घालीत ह्मावें.

४ धोत्र्याचा पाला, पांगाऱ्याचा पाला व हेदीचा पाला (कोंवळ्या तुंबऱ्या) ह्यांचा रस क्षतांत पिळावा.

क्षतांतील कृमि झाडण्याचे मंत्र.

१ अंमरकाठी कम्मरकाया चांदाची गाय कणसें खाय ✱. मास फूल किडा झडून जाय: पुरा मंत्र ईश्वरी वाचा. १

दुसरा मंत्र- मुंढेरे मुंढे सात मुंढे उफराठा मुंढ नर किडा झडे. २

या दोन्ही मंत्रांचें असें विधान आहे कीं; ग्रहणाचे दिवशीं स्नान करून एकशें आठ वेळ प्रत्येक मंत्राचा जप करावा. म्हणजे मंत्र सिद्ध होतो. (उपयोग करण्याचा अधिकार येतो) परंतु याप्रमाणें मंत्र तयार करून ठेविल्यानंतर केव्हां ही भोजनसमयीं रजस्वलेचा शब्द ऐकूं नये. कदापि ऐकण्यांत आल्यास तसेंच त्या अन्नाचा त्याग करून एक दिवस उपोषण करून नंतर जेवावें. व रात्रो भोजनसमयीं

दिवा गेल्यासही ह्याप्रमाणेंच केलें पाहिजे. नंतर जेव्हां मंत्र उपयोगांत आणावयाचा तेव्हां शुचिर्भूत होऊन हरभऱ्या एवढे सात खडे हातांत घेऊन मंत्रानें सात वेळ अभिमंत्रावे. त्यासमयीं प्रत्येकवेळीं * असें चिन्ह केलें आहे त्या जागीं ज्या गुराकरितां मंत्र म्हणावयाचा, त्याचें जें नांव असेल तें घ्यावें. आणि ते खडे क्षतावर फेंकावे. म्हणजे किडे बाहेर निघतात. हें अनुभवसिद्ध आहे. परंतु आपल्या लोकांत एक अशी रूढी आहे कीं, मंत्रप्रसिद्ध झाल्यानें त्याचा गुण जातो. या साठीं त्या गोष्टीचा अनुभव पहाण्याकरितांच हे मंत्र लिहिले आहेत. तर एखाद्या उद्योगी मनुष्यानें वरसांगितल्याप्रमाणें या मंत्रांचा उपयोग करून पहावा. गुण येतो अशी खात्री झाल्यास आम्हास कळवावें. म्हणजे वृश्चिक सर्प इत्यादिकांवरचे जे मंत्र आह्मास माहीत आहेत त्यांचा समयविशेषीं पुस्तकांतच समावेश करून प्रसिद्ध करूं.

क्षतांतील कृमि सर्व नाहींसें झाल्यावर दिंड्याचें ओलें मूळ ठेंचून त्यांत जुन्या रुवाची राख मिश्र करावी. आणि तें मिश्रण क्षतावर बसवावें. (लावावें.) येणेंकरून खरपुडी-(खपली) लौकर धरून क्षत त्वरित बरें होईल.

## गुरूं मोडल्यास.

कोणत्याही कारणानें गुराचा पाय वगैरे मोडल्यास शिंग मोडलें असतां ज्याप्रमाणें निवडुंगाच्या र्चिकांत, शेंदूर घालून मिश्रण तयार करण्याविषयीं सांगितलें आहे. त्या

प्रमाणें मिश्रण तयार करून मजबूद (जाड) फडक्यावर एक अंगूळ किंवा अर्ध अंगूळ जाड सारखें लेपावें. (चोपडावें) मोडलेलें हाड असल्यास तें नीट समूर करून त्या जाग्यावर सभोंवती लेप लावलेली बाजू त्याजवर टेंकून वेष्टन करावें. व त्याजवर आणखी एक जाड फडक्याचें वेष्टन देऊन जेवढी जागा मोडली असेल तितक्या लांबीचे कळकीच्या काठीचे तुकडे करून, एक अंगूळ जाडीचीं गुळगुळीत भेतें तयार करून दाखविल्या नमुन्या प्रमाणें भाळी बांधावी. (विणावी) आणि त्या लेपाचे वेष्टनावर ही भाळी सारखी सभोंवती बसवून जोरानें मजबूद दोरीनें कसून बांधावी. कदाचित् निवडुंगाचा चीक न मिळेल तर मालेबंद म्हणजे सुग्रणीच्या झाडाची साल बारिक कुटून जो रेंदा होईल त्यांत नाचण्याचें पीठ कालवून त्याचें चोपडण, फडक्यावर एक अंगूळ जाड करून, वर सांगितल्या प्रमाणें पट्टा बांधून त्यावर भाळी बांधावी. दोन प्रकारांपैकीं कोणत्याही प्रकारची भाळी बांधिल्यावर त्याजवर मास वगैरे न बसण्या विषयीं चांगली नजर ठेवावी. मोडलेल्या गुरांस केव्हां केव्हां उचलून उभें करावें. अथवा वेंटावर (माच्यावर) ठेवावें. एकाच कुशीवर सतत राहूं देऊं नये. या प्रमाणें सहा दिवस गेल्यावर मध्यें योग्य वाटल्यास भाळी सोडून पाहून पुनः मजबूद बांधावी. जेव्हां दुखरी जागा चांगली बरी होते, तेव्हां ती भाळी आपोआप सैल होऊन येते. नंतर जरूर न वाटल्यास लेप राहूं देऊन भाळी सोडून टाकावी. किंवा पुन्हा साधारण आंवळावी.

## भाळी तयार करण्याचा नमुना.



## कंपवायू रोगाचें लक्षण आणि त्याचे उपचार.

जें गुरूं वयोवृद्ध नसून तरुण असतां त्याजला एकाएकीं पडल्यामुळें किंवा वाताधिक्य होऊन शरीराचा कांहीं भाग थरथरां कांपूं लागतो. हा रोग क्वचित् होतो. व तो बैलांसच फार होतो. आणि मुख्यत्वें करून गळ्याखालील सांखळ व मान हींच कांपूं लागतात. एकंदरींत वातसंचारानें ही व्यथा उत्पन्न होते.

## उपचार.

ह्या रोगावर पोरांस औषध देणें झाल्यास तें फार प्रखर असूं नये. व थंड ही असूं नये. सौम्य उष्ण अशीं औषधें द्यावीं. मस्तकावर व सांखळीच्या दोहों बाजूंस व पुढल्या पायांच्या प्रत्येक संधीवर आणि दोन्ही कानाच्या मागील बाजूस डाग द्यावे. येणें करूनच चांगला गुण येतो.

हा रोग ज्या गुरांस झाला असेल, त्याजला गव्हांची कण्हेरी गूळ घालून द्यावी. ओली चार घालूं नये. व थंड पाणी पाजूं नये. भातयेण गवत किंवा सुकलेला चारा (इतर जातीचें-

गवत ) हें खाणें द्यावें.

## गोंचड्या झडण्यास.

तंबाखू ओढण्याच्या घुरगुडींतील तीन दिवसांचें पाणी अथवा तंबाखू पाण्यांत कुंवळून तें पाणी घेऊन त्यांत कांगोणी, मोगलीएरंड व टाकळा या तिन्ही झाडांच्या पाल्याचा रस. अथवा यांपैकीं जें मिळेल त्याचा रस एक चतुर्थांश मिश्र करून आंगास चोळून मर्दन करावें आणि एक तास अवकाश मध्यें जाऊं द्यावा. परंतु हें औषध लाविल्यावर तें गुरूं आपलें आंग चाटील तर चाटूं देऊं नये. नंतर तंबाखूच्या योगानें कैफ चढल्यासारखें गुरूं कांपूं लागेल त्या बरोबर तलावांत किंवा नदींत त्यास नेऊन स्वच्छ अंग धुवावें. तंबाकू जास्त चढला असें वाटेल तर कांदे खाऊं घालावे. अथवा कांद्याचा रस काढून पाजावा. हें औषध दोन तीन दिवस लाविल्यानें सर्व गोंचड्या झडतात. मात्र औषध लाविल्यावर त्या गुरावर चांगली नजर ठेवून कांदेजवळ घेऊन रहावें. कारण तंबाकूच्या कैफास कांदा हा अत्युत्तम उतार आहे.

## पिस्वा ( पुशा ) न होण्यास व झाल्या असतां जाण्यास उपाय.

गोठ्यांत किंवा गोठ्याचे सभोंवती संचित उकरड, शेण व मूत्र यांचा संचय झाल्यानें पिस्वा होतात. या साठीं जागा स्वच्छ ठेवावी. व एका गोठ्यांतून दुसरे ठिकाणीं गुरें बां-

धण्यास नेलीं असतां प्रथमचे गोठ्यांत (गुरें बांधण्याचे जाग्यांत) रात्रो सतत चारदिवस सारी रात्र दिवा लावून ठेवावा. गुरें दुसऱ्या जागीं नेतांच पहिली जागा स्वच्छ झाडून सारवावी. आणि त्या जमिनीवर राख ह्यांतरावी. ह्या प्रमाणें तीन रोज केल्यानें पिस्वा होत नाहींत.

गुरांचे आंगावर पिस्वा झाल्या असतां उंडेल तेल सर्वांगास लावून एक प्रहर झाल्यानंतर रिंग्याचा फेंस किंवा गांवठी साबण लावून अंग स्वच्छ धुवावें. नंतर चिंचुरट्या वायंगीचे पाल्याचे रसांत अथवा उंडयांचे गीर पाण्यांत उगाळून त्यांत गेळीच्या झाडाचीं फळें (गेळफळें) उगाळून तें मिश्रण दिवसांतून तीन वेळां आंगास लावावें. ह्याप्रमाणें तीन रोज करावें. नंतर चवथ्या दिवशीं पुन्हा उंडयेल व साबू लावून अंग धुवावें. ह्या उपचारानें घोडे, कुत्रे, गुरें इत्यादि जनावरांचे आंगावरील पिस्वा त्वरित नाहींशा होतात.

## व्यालेल्या गाई किंवा म्हशी यांस दूध सुटण्यास.

१ नूतन व्यालेल्या गाई किंवा म्हशी यांजला प्रथम दूध अगदीं सुटत नाहीं, असाही प्रकार क्वचित् होतो. यास्तव अशा प्रसंगीं शतावरी (शतमुळीचीं) ओलीं मुळें ठेंचून त्यांचा रस सुमारें एक शेरपर्यंत काढावा. त्यांत तितकाच नारळाचा रस मिश्र करून प्रत्यहीं एक वेळ प्रमाणें तीन, पां-

च किंवा सात दिवस द्यावें.

२ वेंदर या नांवाची एक वेल आहे. या वेलीस लहान-शा सुरणाएवढे कंद असतात. ते कंद आणून स्वच्छ धुवा-वा आणि किसून उडदांच्या डाळींत मिश्र करून खाऊं घा-लावा. हा कंद फार उष्ण आहे. याजकरितां त्या गुरांचे शक्ती-प्रमाणें थोड थोडाच द्यावा.

वर सांगितलेल्या औषधांनीं तीन दिवसांत दूध सुटतें. परंतु हीं औषधें उष्ण आहेत. याजकरितां तीं तीन दिवस देऊन दूध सुटल्यावर मग एक महिनापर्यंत नित्य नांचुळां-चे कण्हेरींत पावशेर प्रमाणें तूप घालून नित्य एक वेळ प्रमाणें द्यावें. खाणें, पिणें इत्यादि शीत (थंड) उपचार करीत जावे.

## रक्तवादा (वारव्याचा रोग.) याचीं लक्षणें आणि उपचार.

रक्तवादा यास काळिजपेय, वारव्याचा रोग इत्यादि म्हणतात. हा रोग सांथीनें येणारा स्पर्शजन्य मोठा घातक आहे. पटकीसारखाच याचा अद्भुत पराक्रम आहे. हा रो-ग एकदां ज्या गोठ्यांत शिरतो तेथें बहुत करून गुरूं शि-ल्लक राहत नाहीं. या रोगोद्भवाचीं आरंभींचीं लक्षणें हीं आहेत कीं, गुरांस प्रथम दोन दिवस प्रखर ताप येतो. आ-णि मळावष्टंभ होऊन खडा धरतो. ह्या स्थितींत गुरें सा-धारण गवत वगैरे खातात. परंतु दोन दिवसांत शेण करि-त नाहींत. तिसरे दिवशीं डोळ्यांतून पाणी गळूं लागतें. व-

एक दोन रेच केवळ पाण्याप्रमाणें शेणाचे होतात. त्यास दुर्गंधी अल्प असते. इतक्या वेळांत आंगावरील लंव फुल-ते. दांत हालूं लागतात. तोंडांतून लाळ येते. आणि खा-ण्यापिण्याचा व्यवहार बंद होऊन गुरूं म्लान होतें आणि मळद्वारानें आंतडीं तुटून रक्तमिश्रित दुर्गंधीयुक्त पडूं लागता-त. प्रथमारंभीं त्यांत मळ (शेण) याचा कांहीं भाग अस-तो. परंतु दोन घटकेंत शेणाचा अंश नाहींसा होऊन फक्त आंतडीं आणि रक्त पडूं लागतें. व त्यावेळीं गुरांचे शरीरां-तील सर्व सांधे सैल होऊन विगलित होतात. आणि कुंथ घालूं लागतें. (उर्ध्व लागतो.) नंतर उपचार लागू होत ना-हीं. ज्या गुरांस वेळेवर औषध पांचून रोगांतून बचावतात; त्यांच्या तोंडांत किडे पडतात. आणि आंगावर मोठमो-ठ्या गांठी उठतात. हा रोग म्हशी, रेडे, बैल इत्यादि सर्वगु-रांस होतो.

## उपचार.

१ मृत मनुष्यें दग्ध करितात त्याची, पायांचे जांगेपासून वरील भागाची राख सुमारें १० तोळे घेऊन कात्रेनिर्गुंडीचे पा-ल्याचा पाणी घालून काढलेला रस तोळे ४ आणि धामणी-चे सालीचा रस तोळे २० एकत्र करून त्यांत ती राख काल-वून नित्य एक वेळप्रमाणें दोन दिवस द्यावें. हें औषध राम-बाण गुण देणारें आहे.

२ रेडे अनशी (घायपात) चे कांद्याचा रस पावशेर

काढून एक शेर ताकांत मिश्र करून सकाळीं व सायंकाळीं दुवक्त तीन दिवस द्यावा.

## विशेष समजूत.

वर सांगितलेलीं दोन्ही औषधें सर्वत्र ठिकाणीं मिळणारीं आणि हस्कून गुण देणारीं आहेत. रोगोद्भव होतांच दिल्यानें गुरूं जायां होत नाहीं

रोगी गुरांचे तोंडांतून जी लाळ पडते ती दिवसांतून दोन चार वेळां काढून टाकून तोंड उघडून ऊन पाण्यानें स्वच्छ धुवून पुसावें. म्हणजे कृमि होत नाहींत.

तुरीची डाळ एक शेर घेऊन त्यांत घागरभर पाणी घालून शिजवून काढा करून ठेवावा. वेळोवेळीं यांतील. काढा एक एक शेर साधारण ऊन करून त्यांत ७ तोळे पर्यंत तूप घालून दिवसांतून तीन वेळां पाजावा.

रोगांतून बचावलेल्या गुराच्यानें ८ दिवसपर्यंत गवत वगैरे खाववत नाहीं. ह्या साठीं कण्हेरी करून त्यांत गूळ व तूप घालून देत जावी.

या गुरांस ९ दिवसपर्यंत पाणी पाजूं नये. पाण्या ऐवजीं बाभळ. कुंभ्याची साल, किंजळीची साल, आयनाची साल. आंवळीची साल, खैराची साल, यांपैकीं ज्या साली मिळतील त्या ठेंचून रांपाचा काढा करून ठेवावा. आणि तो पाण्याचे अभावीं द्यावा.

## गुरांस विषार झाला असतां त्याचीं लक्षणें.

गुरांस विषारी प्राण्यांपैकीं सर्प, कांडर व आघ्याघणस यांपैकीं कोणत्याही किरडुचाचा दंश झाला तर विषार बाधतो. तसाच पाल व कोळी ह्यांचा विषार बाधतो. अन्य फुरसें वगैरेचा विषार बाधत नाहीं.

गुरांस मुख्यत्वें करून मुस्कुरीवर अथवा जिव्हेस किंवा गेळांत दंश होतो. याकरितां प्रथम ह्या स्थानीं विषारी प्राण्याच्या दंशानें क्षतें झालीं आहेत कीं काय हें पहावें आणि त्या दंशस्थानाचे क्षतांवरून चतुर मनुष्याकडून कोणता विषार झाला याचें निदान (परीक्षा) करावें आणि औषधें द्यावीं.

विषार झाला असतां गुरांचे मुस्कुरीवर जो ओलसरपणा असतो तो एकाएकीं सुकतो. पोट फुगतें. अंग तप्त होतें. कानांचीं अग्रें थंड होतात. तोंडांतून फेंसरट लाळ पडते. हीं साधारण लक्षणें आहेत.

### सर्पाचे विषाराचीं लक्षणें आणि उपचार.

गुरांस सर्पदंश जाहला असतां वर सांगितल्याप्रमाणें प्रथम लक्षणें होतात. व दुसऱ्या यत्तेस तें गुरूं ग्लानी येऊन पडतें. कांपूं लागतें. वेळोवेळीं थोड थोडया अवकाशानें विषाराच्या लहरी ओढी किंवा पेटके येतात. तेव्हां फार जलद डोळे मिचकावितें व त्या गुराचा झोंकु पुढील बाजूस फार असतो. इत्यादि लक्षणांनीं

सर्पविषाराची परीक्षा करावी.

## उपचार.

१ काळ्या कुडईची साल, व खुरचांफ्याची साल ह्या दोन्ही साली एका मनुष्यानें तोंडांत घेऊन चावून विषार झालेल्या गुरांच्या दोन्ही नाकपुड्यांत जोरानें फुंक मारावी. नंतर तत्काळ तोंडांतील औषध थुंकून टाकून वर खोबरें चावून थुंकावें. आणि चूळी भरून तोंड स्वच्छ धुवावें. असें न केल्यास तोंडांत फोड येतील. हें प्रथमच्या यत्नेस केल्यानें गुण येतो.

२ दुसऱ्या यत्नेस वर सांगितलेल्या दोन्ही सालींचा कच्चा दीडशेर पर्यंत रस काढून नाकानें व तोंडानें पाजावा.

३ पारिजातकाची साल, बेलाची साल, व खुरचांफ्यांची साल ह्या तिन्ही सालींचा एक शेरपर्यंत रस काढून पाजावा. हें औषध थोडथोडे अवकाशानें दोनतीन वेळही द्यावें.

४ पांढऱ्या कण्हेरीचा पाला व वाकांडीचा पाला हे दोन्ही एकएक तोळा घेऊन बारिक वाटून रस काढावा. हा रस गुरांची शक्ती पाहून (जोर पाहून) दोन तोळेपर्यंत पाजावा. जरूर वाटल्यास दोन तीन वेळही द्यावें.

५ रिंग्यांच्या फेंसाचें अंजन करावें व रिंग्यांचें पाणी एकशेरपर्यंत पाजावें.

६ येरवंड व सापसंद यांचा रस एक शेरपर्यंत काढून त्यांत खडकी, गुळवेलीचा कांदा तीन तोळे पर्यंत उगाळून

द्यावा. (पाजावा)

## आग्या घणसाचे विषाराचें लक्षण आणि उपचार.

आग्या घणसाचा दंश जाहला असतां चार घटकेचे आंत सर्वांगावर मोठमोठ्या गांठी उठतात. अंग तप्त होतें. तोंड व मूत्रस्थान यांस सूज येते. वारंवार मूत्र होतें. सर्वांगाचा दाह होतो. उपचार न झाल्यास दोन प्रहरांत गुरूं मरतें.

## उपचार.

फळ आंबाड्याचे झाडाची साल ३, कुणकाची साल २, व खुरचांफ्याची साल १, ह्या भागानें तिन्ही साली एकत्र कुटून त्यांचा रस दोनशेर पर्यंत काढावा. त्या रसांत घणसरीचें पाळ तीन तोळेपर्यंत उगाळून पहिल्यानें एकशेर व मध्यें दोन तास गेल्यावर अच्छेर याप्रमाणें तीन वेळ औषध द्यावें. ह्या औषधानें त्वरित गुण येतो.

## कांडराचे विषाराचें लक्षण आणि उपचार.

ज्याप्रमाणें सर्पदंश होऊन क्षत होतें; तसेंच कांडराचे दंशानें होतें. कांडराचा दंश झाला असतां सर्व शरीरांतील रक्ताचा फेंस (कफ) होतो. हा कफ केवळ राबेप्रमाणें घट्ट आणि दोरट असतो. व जेव्हां या कफानें छाती आणि घसा भरतो. तेव्हां श्वासोच्छ्वासाचा अवरोध होऊन गुरें व मनुष्यें मरतात. हें विष फार दुर्धर आहे. मुख्यत्वें करू-

न कफाचें पाणी तत्काळ होण्याजोगीं जीं औषधें असतील, तीं योजावीं. सर्पविषारानें किंवा घणसाचे विषारानें गुरांचे तोंडांतून जी लाळ पडते. ती फार चिकट नसते. परंतु कांडराचा विषार झाला असतां दोरट लाळ पडूं लागते. ही मुख्य परीक्षा होय.

## उपचार.

१ तांबड्या काजविणीच्या सालीचा अंगरस काढून त्यांत रिंग्यें (रिठे) कुंवळून प्रतिवेळीं एकशेरप्रमाणें वरचेवर पाजावा.

२ कोसंब, काळेनिगुड, तांबडी काजवीण या तिन्ही झाडांच्या समभाग साली आणून ऊन पाणी घालून रस काढावा. त्यांत एक गुंजपासून तीन गुंजापर्यंत मोरचूत उगाळून पाजावा.

३ वेळपांदरीचें मूळ व शेंबीची साल आणि वाकांडीचा पाला ह्या तिन्ही औषधांचा ऊन पाणी घालून एकशेर रस काढून त्यांत रिंगीं (रिठा) उगाळून पाजावा. हें औषध घटके घटकेच्या अवकाशें दोन तीनवेळही द्यावें. वउतार पडल्यावर दुसरे दिवशीं भाताचें गरगट (कण्हेरीपेक्षां जाड भात) करून त्यांत अच्छेरपर्यंत तूप घालून द्यावें. याप्रमाणें सतत तीन दिवस हा उतार दिला पाहिजे.

## कुसड्या घणसाचे विषाराचें लक्षण व उपचार.

जसा आग्या घणस असतो, तसाच कुसडा घणस

असतो. परंतु त्याचे आंगावर लहानसर चट्टे असतात. या घणसाचा दंश कोणत्या ही जागीं झाला असतां किंवा या घणसाची गरळ आंगास लागली किंवा खाण्यांत आली तरी विषार बाधतो आणि आंग कुजल्या सारखें होऊन विघरतें. उपचार न केल्यास सर्वांग व शरीरांतील आंतडीं कुजून प्राणनाश होतो. ह्या विषाराचा तात्कालिक अम्मल चढत नसून सर्व व्याप्त होण्यास समयीं एक वर्षही लागतें.

## उपचार.

१ घणसकांड्याचे वेलीचा, पाणी घालून, अच्छेरपर्यंत रस काढावा. त्यांत तितकाच नारळाचा अंगरस घालून प्रत्यहीं एक वेळ प्रमाणें सात दिवस द्यावा.

२ घणसरीचे पाल्याचा, पाणी घालून, एक शेरपर्यंत रस काढावा. व त्या रसांत घणसरीचीच मुळी एक तोळा पर्यंत उगाळून पाजावा. ह्या प्रमाणें तीन दिवस प्रत्यहीं एक वेळ औषध द्यावें. व रिंग्याचे पाण्यांत घणसरीचें मूळ उगाळून कुजलेल्या जागीं वारंवार लेप करावा.

## कोळी किंवा पालीचा विषार झाल्यास उपचार.

कित्येक लोकांची अशी चाल असते कीं, तांदुळांचें धुवण व खरकटीं भांडीं धुतलेलें पाणी वगैरे जमावून ठेवून तें गुरांस खाऊं घालितात. परंतु अव्यवस्थित उघडें ठेविल्यानें त्या भांड्यांत एखादी पाल अथवा कोळी त्या पाण्यांत पडतो नंतर तें पाणी आस्थापूर्वक न पाहतां तसेंच गुरांचे पुढें ठेवितात, त्या वेळीं विषारी प्राणी पाल किंवा कोळी त्यांचे खाण्यांत येऊन विषार बाधतो. तेव्हां सर्वांगावर गांठी उठतात. तोंडांतून लाळ वाहूं लागते. मूत्र तांबुस रंगाचें होतें. इत्यादि लक्षणांनीं हा विषार ओळखावा.

### उपचार.

नदीचे कांठीं पालोरें या नांवाचीं झाडें असतात. त्या झाडांचा पाला व तुंवऱ्या एकत्र कुटून अच्छेरपर्यंत रस काढावा. त्यांत तितकाच नारळाचा अंगरस घालून प्रत्यहीं एक वेळ प्रमाणें हें औषध सात रोज द्यावें.

## कडवीचा विषार झाल्यास.

रानांत घाटदरीस कडवी या नांवाची एक वेल आहे. या वेलीचीं पानें गुरें फार झटून खातात. हीं पानें खाल्यानंतर सुमारें एक प्रहरांत ज्या प्रमाणें सर्पदंश

झाला असतां लक्षणें होतात तशीं सर्व लक्षणें गुरांस होतात. व लहरी ही येतात. परंतु सर्पदंशाचीं क्षतें असतात. तो प्रकार कडवी लागलेल्या गुरांस नसतो. यावरूनच परीक्षा करावयाची. कडवी चढली असून उपचार न झाल्यास तत्काळ गुरूं मरतें.

## उपचार.

एक पायली कुळीथ (हुलगे) घेऊन त्यांत वजनी दोन मण पाणी घालून शिजवावे आणि तें पाणी सुमारें दीड मण राहिल्यावर गाळून घ्यावें. किंवा तसेंच ओतून घेऊन कोंबट झाल्यावर पोटभर पाजावें. व नंतर पुन्हा पाणी घालून शिजवावे आणि वारंवार पाजीत रहावें. या योगानें एक तासांत रेच होऊन कडवीचीं पानें जीं खाण्यांत आलेलीं असतात तीं सर्व मळांतून पडतात आणि त्वरित गुण येतो.

## रेचक औषधें (गुरांस देण्याचें सूक्ष्म रेचक.)

जैपाळाच्या बिया सोलून दोन भाग करावे म्हणजे त्यांचे मध्यभागीं तर किंवा जीभ असें ज्यास म्हणतात तो काढून टाकून डाळिंब्यांची पूड करावी. ही पूड दीड मासापर्यंत वडागरी मीठ चार तोळे पर्यंत या प्रमाणें मिश्र करून अच्छेरपर्यंत ऊन पाण्यांत मिश्र करून द्यावें. अथवा तांदुळांचे पेजेंत किंवा कण्हेरींत मिश्र करून द्यावें.

## दुसरें रेचक औषध.

वडागरी मीठ चार तोळेपासून सहा तोळेपर्यंत व वेळ्या चार मासे पर्यंत व सुंठीची पूड नऊ मासे पर्यंत ह्या तिन्ही औषधांची पूड करून गूळ चार तोळे घेऊन त्यांत गोळी बांधावी. नंतर ऊन पाणी सुमारें कच्चा एक शेर पर्यंत घेऊन त्यांत ती गोळी कालवून पाजावें.

**सूचना**- औषध देणारानें गुरांची शक्ति व कोठ्याचा अवष्टंभ ह्या दोन्ही गोष्टींचा विचार करून औषध द्यावें.

## वांसरांस किंवा गुरांस कृमि झाले असतां देण्याचें औषध.

टाकळ्याच्या पाल्याचा रस काढून त्यांत तिनकेंच ताक घालावें आणि गंधक एक तोळापर्यंत व हिंग पाव तोळा पर्यंत दोन्हींची पूड करून त्यांत मिश्र करून पाजावी. वांसरांस देणें झाल्यास रस नवटांक व औषधें चतुर्थांश असावीं. थोर गुरांस शक्ती प्रमाणें अच्छेर पासून एक शेरपर्यंत रस व लिहिल्या प्रमाणें वजनानें औषधें असावीं.

समाप्त.

